# संगीत शारदा



लेखक : कै० गो. ब. देवल




कॉंटिनेंट्ल बुक सर्व्हिस, पुणें २.

## आभार

संगीत ' शारदा ' नाटकाच्या प्रस्तुत आवृत्तीचें दर्शनी चित्र तयार करण्यास साहाय्य केल्याबद्दल पुणें येथील सुप्रसिद्ध छायाचित्रकार श्री. **वा. ना. भट**, 'किर्लोस्कर कंपनीं'तील ख्यातनाम नट श्री. **चिंतोबा गुरव** ( दिवेकर ) व 'नाट्य निकेतन'मधील अभिनयकुशल नटी श्री. **शालिनी देशपांडे** यांचा व पुस्तकाची छपाई सुंदर करून दिल्याबद्दल 'सुलभ मुद्रणालया'चे श्री. **राजाभाऊ सरनाईक** यांचा मी फार आभारी आहें.

—**प्रकाशक**



१९५६

**मूल्य दोन रुपये फक्त**

प्रकाशक :
**गो. रा. पाटणकर**
कॉंटिनेंट्ल बुक सर्व्हिस
६२६ शनिवार, पुणें २.

मुद्रक :
**रा. ना. सरनाईक**
सुलभ मुद्रणालय
२९१ शनिवार, पुणें २.

# संगीत शारदा नाटक

श्रीमंत राजेश्री

**गंगाधरराव गणेश ऊर्फ बाळासाहेब पटवर्धन**

**मिरज संस्थानचे अधिपति**

**यांचे**

निर्व्यसनिता, सदुद्यमशीलता, स्वभावसरलता, विचारोदारता

इत्यादि गुणांवर लुब्ध होऊन कर्त्यानें त्यांचे सेवेसी

**सप्रेम व सन्मानपूर्वक**

समर्पण केलें असे.

## नाटकांतील पात्रें

| | |
|---|---|
| **श्रीमच्छंकराचार्य** ... | ... जगद्गुरु. |
| **कोदंड** ... ... | ... श्रीमच्छंकराचार्यांचा एक शिष्य. |
| **हिरण्यगर्भ ऊर्फ शामसुंदर** | ... कोदंडाचा स्नेही. |
| **भुजंगनाथ** ... ... | ... एक जराग्रस्त परंतु विवाह करण्याला उत्सुक असा श्रीमंत गृहस्थ. |
| **भद्रेश्वर दीक्षित** ... | ... विवाह जुळविणारा मध्यस्थ. |
| **कांचनभट** ... ... | ... शारदेचा बाप. एक धनलोभी भिक्षुक. |
| **जयंत** ... ... | ... शारदेचा लहान भाऊ. |
| **सुवर्णशास्त्री** ... | ... एक नामधारी शास्त्री. |
| **गोरख** ... ... | ... एक पहारेकरी. |
| **शारदा—नायिका** ... | ... कांचनभटाची उपवर कन्या. |
| **इंदिराबाई** ... ... | ... शारदेची आई. |
| **वल्लरी** ... ... | ... सुवर्णशास्त्र्याची मुलगी, शारदेची मैत्रीण. |
| **मंदाकिनी, तुंगा, त्रिवेणी, जान्हवी, शरयू** ... | ... शारदेच्या मैत्रिणी. |

कोतवाल, शिपाई, भट-भिक्षुक, गांवांतील मुलें वगैरे.

# संगीत शारदा नाटक

## अंक १ ला

: नांदी :

पद्य ( राग-हमीर : चौताल. )

शंकरपद वंदिं आधीं ॥ मग नत बलवंतपदीं ॥ आस्ताई ॥
वाग्देवीकंठमणी ॥ प्रतिधाते ज्ञानतरणि ॥
रसगंगा यद्वाणी ॥ नमितों ते सुकवि हृदीं ॥ १ ॥

पद्य ( राग-वहार : त्रिताल )

सौख्य पूर्ण देवो तुम्हां श्रीगिरिजेचा कांत तो ॥ धृ० ॥
केश धवल हे विधुकांतीनें ॥ किंवा कांते भस्मलेपनें ॥
नसे ग्रस्त मी वार्धक्यानें ॥ असें हंसत जो सांगतो ॥ १ ॥

( नांदीनंतर परिपार्श्वक जातात. )

**सूत्र०**—वाहवा ! सुंदर चित्रविचित्र पुष्पांनीं शोभणाऱ्या कुसुमवाटिकेप्रमाणें ही प्रसन्नमुख सभा पाहून आनंद होतो; परंतु आतां कोणत्या नाटकानं हिचं रंजन करावं, हेंच सुचत नाहीं. कारण—

: साकी :

अभिरुचि कोणा शृंगाराची, कोणा वीर रसाची ॥
हास्य रुचे कोणास करुणही, रुचि न एक सकळांची ॥
एका आवडतें ॥ तेंचि दुजाला नावडतें ॥ १ ॥

( **विचार करून** ) या प्रसंगीं माझ्या चतुर भार्येचा अभिप्राय घ्यावा हें वरं. ( **पडद्याकडे पाहून** ) अरे वा ! स्मरण करण्याबरोबर पुढें उभी !

हें एक सुचिन्हच म्हणायचं. प्रिये, कांहीं महत्त्वाच्या कामांत मला तुझा अभिप्राय पाहिजे.

**नटी**—( **बाहेर येऊन** ) ही सभा आणि हा थाट पाहून बहुतेक लक्षांत आलंच आहे; पण एकदां मुखांतून ऐकलं म्हणजे बरं. अशा कोणत्या महत्त्वाच्या कामांत माझा अभिप्राय पाहिजे ?

**सूत्र०**—

**: साकी :**

**परिचित जो या रसिकजनां त्या कवि गोविंदें रचिलें ॥**
**शारदाख्य नवनाटक गानीं, विविधगुणीं जें खचिलें ॥**
**प्रयोगरूपें तें ॥ रुचेल यांना का कांते ? ॥ १ ॥**

**नटी**— ( **त्रासानें** ) तरी मीं म्हटलंच ! मेलं ध्यानीं, मनीं, स्वप्नीं सदां सर्वदां नाटक ! नाटक ! नाटक ! मी म्हणतें—

**पद्य** ( राग–झिंजोटी : त्रिताल. )

**अजुनी खुळा हा नाद पुरेसा कैसा होइना ॥ धृ० ॥**
**नाटक झालें जन्माचें, मनिं का हो येइना ॥ १ ॥**
**व्यसनें जडलीं नवीं नवीं, कुणि तिकडे पाहिना ॥ २ ॥**
**नांव बुडविलें वडिलांचें, कीर्ति जगीं माइना ॥ ३ ॥**

**सूत्र०**—प्रिये, तूं म्हणतेस तशी आमची स्थिति झाली आहे खरी, परंतु तिचं कारण नाटक नव्हे !

**नटी**—तर मग कोणतं ?

**सूत्र०** — दुसरं कोणतं असणार ?

**: साकी :**

**अदूर-दर्शित्वानें केवळ ही स्थिति आम्हां आली ॥**
**दोष तयाचा व्यर्थ ठेविसी नाट्यकलेच्या भालीं ॥**
**कारण दुष्काळा ॥ मानिल कोण कोकिलेला ॥ १ ॥**

वेडी रे वेडी ! म्हणतात तें बरोबर, कीं स्त्रियांचं शहाणपण चुलीपुरतंच. हे कार्यकारणांचे गहन संबंध तुम्हांला कसे कळावेत !

**नटी**—कळत नाहींत तेंच बरं. कार्यन् कारण समजणारे शहाणेसुरते पुरुष काय दिग्विजय लावताहेत, तें दिसतंच आहे. परवां त्या थेरड्या सुदाम सावकारानं इतके पैसे ओतून, त्या दहा वर्षांच्या पोरीशीं लग्न केलंन्, तें कार्यकारणांचा संबंध पाहूनच केलं असेल नाहीं ? मोठा मोठा वाईट काळ आला आम्हां बायकांना !

**पद्य** ( राग-पिलू : त्रिताल )

**काय पुरुष चळले बाई ।। ताळ मुळीं उरला नाहीं ।।**
**धर्म-नीति-शास्त्रें पायीं ।। तुडविती कसे हो ।। ध्रु० ।।**
**साठ अधिक वर्षे भरलीं ।। नातवास पोरें झालीं ।।**
**तरिहि नव्या स्त्रीची मेली ।। हौस कशि असे हो ।। १ ।।**
**घोडथेरड्यांना ऐशा ।। देति बाप पोरी कैशा ।।**
**कांहिं दुजी त्यांच्या नाशा ।। युक्ति कां नसे हो ।। २ ।।**
**शास्त्रकुशल मोठे मोठे । धर्म-गुरुहि गेले कोठें ? ।।**
**काय कर्म असलें खोटें । त्यांस नच दिसे हा ।। ३ ।।**

**सूत्र०**—प्रिये, ब्राह्मणवर्णावरलं हें लांच्छन काढून टाकण्याचा श्रीमत् जगद्गुरूंचा तर संकल्प झालाच आहे; आणि त्याप्रमाणें त्यांनीं लोकांना उपदेश करण्याकरितां कांहीं शिष्यांचीहि योजना केली आहे; परंतु सर्व लोकधुरंधरांनींहि एकबुद्धीनं या कामीं पुढें सरसावलं पाहिजे. तशांतही तुझ्यासारख्या स्त्रियांचं साह्य मिळेल, तर उत्तमच.

**नटी**—मी तयार आहें. मला जर एखादा म्हातारा नवरदेव भेटेल, तर मी त्याचे चांगले कान उघडीन. ( **पडद्यांत मुलें** ) अहो भुजंगनाथ आजोबा ! संन्यास घ्या संन्यास !

**भुजंग०**—अरे जा ! मला संन्यास द्यायला ब्रह्मदेव आला पाहिजे, ब्रह्मदेव !

**सूत्र०**—( **पडद्याकडे पाहून** ) वाहवा तूं म्हणायला आणि हा भुजंगनाथ यायला एक गांठ पडली.

**नटी०**—कोण हा ?

**सूत्र ०**—तुला एक म्हातारा नवरदेव पाहिजे होता ना ? तोच हा !

**: दिंडी :**

**जरठ इतुका तरि डौल कसा आहे ? ॥ नटुनि सजुनि तरुणांत येऊं पाहे ॥ वृद्ध म्हणतां हा पहा चिडे कैसा ॥ बाल-चेष्टांनीं कृष्णकपिच जैसा ॥ १ ॥**

तर चल; आपण बाजूला होऊन त्याची थोडी मौज पाहूं. ( जातात. )

**भुजंग ०**—( **बाहेर येत** ) समजलों. माझा पुतण्या भैरवनाथ, त्यानं ही माकडसेना चिथावून माझ्या अंगावर सोडली आहे. त्याच्या मनांत अशानं मला वेड लागेल, म्हणजे सरकार मला कोंडून ठेवतील आणि मी निपुत्रिक म्हणून, माझ्या संपत्तीचा वारस याला करतील; पण म्हणावं, माझ्या संपत्तीपैकीं एक कपर्दिकसुद्धां तुझ्या हातीं लागायची नाहीं. आणि एवढ्यासाठींच तर मी लग्न करणार ! ( **पोरें भुजंगनाथ म्हतारा म्हणून ओरडतात. कोणी संन्यास घ्या, दंड घ्या, भगवीं वस्त्रें घ्या, म्हणतात.** ) कोण, कोण मला म्हातारा म्हणतो तो ? आणि मला संन्यास कोण देणार तो येऊं दे असा पुढें !

**भद्रे०**—( **बाहेर येत येत** ) भुजंगनाथ ! काय, आहे काय प्रकरण हें ?

**भुजंग ०**—( **ओळखून** ) आहा ! भद्रेश्वर दीक्षित. अगदीं वेळेवर आलांत. खरा न्याय करा आतां.

**भद्रे ०**— न्याय ? न्याय कसला ?

**भुजंग०**—सांगतों ऐका.

पद्य–( ' जय जय जगज्जननि देवी ' या चालीवर )

**पोरांसह थोर किती । उद्धट हे दुष्टमति ॥**
**जरठ जरठ मज म्हणती । दृष्टिनें उणें ॥ धृ० ॥**
**संन्यासहि सुचविती । भगवे व्हा कोणि म्हणति ॥**
**मुंडा शिर, दंड हातिं । कोणि घ्या म्हणे ॥ १ ॥**

तेव्हां आतां खरं सांगा; तुम्हांला यज्ञोपवीताची शपथ आहे. मी तसा म्हातारा दिसतों का ?

**भद्रे०**—( **आपल्याशीं** ) ' तसा म्हातारा ' म्हणजे कसा ?

**भुजंग०**—का दीक्षित, बोलंत कां नाहीं ? सांगा मी म्हातारा दिसतों का ?

**भद्रे०**—तुम्ही ! आणि म्हातारे ! तुम्हांला म्हातारा म्हणेल कोण ? तसं म्हणतील ते बेटे जन्मांध समजले पाहिजेत. अहो ! ही पेलेदार छाती हे गोटीदार पुष्ट दंड, पीळदार शरीर, हें चर्येवरचं तेज, पाणीदार टप्पोरे डोळे, ही शक्ति, हा मनाचा उत्साह, ही बोलण्याचालण्याची झोंकदार ऐट, इतकीं तारुण्याचीं लक्षणें स्पष्ट स्पष्ट दिसत असून तुम्हांला म्हातारा म्हणणं म्हणजे काय ? जाऊं द्या " हाथी चाले अपने चालसे, कुतर भुकत वांकू भुकवादेव " तुमच्या मनांत नाहीं, नाहीं तर अजून तुमचं लग्नाचं वय आहे.

**भुजंग०**—( **आनंदानें** ) हेंच ! हेंच ! काल आमच्या घरीं एक ज्योतिषी आले होते त्यांनीं मला हेंच सांगितलं.

**भद्रे०**—( **आपल्याशीं** ) शाबास ! आमच्या ज्योतिषीबुवांनीं आम्हीं सांगून ठेवल्याप्रमाणें बीजारोपण तर छान केलंसं दिसतं.

**भुजंग०**—ऐकलं का दीक्षित, ते म्हणाले, कीं यंदां तुम्हांला भार्यायोग असून, पुढच्याच वर्षी सुंदर पुत्रयोग आहे.

**भद्रे०**—आहो ! भोळसरसे पाहून त्या ज्योतिषीबुवांनीं तुमच्यावर जाळं पसरलं वाटतं !

**भुजंग०**—छे–हो ! जाळं कसलं ! अगदीं लहानपणापासून तों काल सकाळपर्यंतच्या सर्व ठोकळ ठोकळ गोष्टी त्यांनीं तंतोतंत पटवून दिल्या.

**भद्रे०**—( **स्वगत** ) न द्यायला काय झालं. मीं त्याच्याजवळ टिप्पणच तसं करून दिलं होतं. ( उघड ) आणि तुम्हांला त्या सर्व पटल्या म्हणतां ?

**भुजंग०**—नुसत्या पटल्या नाहींत, माझी पुरी खात्री झाली.

**भद्रे०**—मग–मग–आमचं बोलणंच खुंटलं. पण—

**भुजंग०**—अहं ! ‘ पण ’ नको तो ! माझ्याकरितां कंबर बांधून एक सुरेख मुलगी शोधून काढा. पण कशी ! हां ! म्हणजे पुढच्याच मुहूर्तावर देऊं उडवून.

**भद्रे०**—म्हणजे ! आपण खरोखरीच नवीन कुटुंब करणार कीं काय ?

**भुजंग०**—मग तुम्हांला इतका वेळ सांगतों तें काय ? ज्योतिषी-बुवांच्या म्हणण्याप्रमाणें, हा यंदांचा भार्यायोग साधलाच पाहिजे.

**भद्रे०**—साधलाच पाहिजे. ( **आपल्याशीं** ) तुझा भार्यायोग आणि माझा द्रव्ययोग.

**भुजंग०**—हं, मग बांधतां ना कंबर ? विचार कसला करतां ?

**भद्रे०**—विचार नाहीं. आमचा धंदाच पडला मध्यस्थीचा, तेव्हां कंबर बांधतों; पण—

**भुजंग०**—पुन्हां आणखी ‘ पण ’ ! येऊन जाऊन माझ्यासारख्या-कडून तुमची योग्य संभावना व्हावयाची नाहीं, हीच तुम्हांला भीति ना ? हें पहा, परवां त्या सुदाम सावकाराकडून तुम्हांला पोंचलं असेल त्यापेक्षां हजार-पांचशें जास्ती, म्हणजे झालं कीं नाहीं ?

**भद्रे०**—नाहीं, ती शंका नाहीं मला. तें होईल कसं तरी. तुम्ही त्यापेक्षां हजार-पांचशें जास्त द्याल, मी आणखी हजार दोन हजार जास्त मागून घेईन; परंतु खरं सांगूं ? आतां तुम्ही या नवीन कुटुंबाच्या भानगडींत पडूं नका. असं सांगणं, म्हणजे मींच आपल्या पायावर धोंडा पाडून घेणं आहे; पण चार-पांच हजार टिकल्यांकडे पाहून, आपला खरा अभिप्राय चोरून ठेवणारा मध्यस्थ मी नव्हे. म्हणून सांगतों, हा नाद सोडून द्या. फार फार हाल होतील.

**भुजंग०**—किती होतील तितके सोशीन; पण हे सध्याचे हाल सोसवत नाहींत ! काय सांगूं तुम्हांला ! ते ऐकाल, तर तुम्हीसुद्धां टिपं गाळाल टिपं !

**भद्रे०**—असे टिपं गाळण्यासारखे हाल म्हणजे कोणते ?

**भुजंग०**—आज चार वर्षांखालीं माझं कुटुंब गेलं, हें तुम्हांला माहीत असेलच ?

**भद्रे०**—हो, आहे; पण हें काय भुजंगनाथ, तुमचे डोळे अगदीं भरून आले.

**भुजंग०**—( दुःखानें ) कां नाहीं यायचे ! अहो, लाखांत बायको होती हो लाखांत ! मला किती जपत असे म्हणून सांगूं ? ( **रडूं लागतो.** )

**भद्रे०**—( **डोळ्यांस पदर लावून** ) असो; ईश्वराची मर्जी ! " आलिया भोगासी असावें सादर " दुसरा मार्ग नाहीं.

**भुजंग०**—तें खरं, पण—

: कटाव :

**निवर्तली ती, तेव्हांपासुनि, जग हें सारें शून्य भासतें, गृह स्मशानापरि मज दिसतें, दिवसाढवळ्या खाया येतें असें वाटतें। त्यांत समंधापरि वावरतां, उदासीनता, जाळी चित्ता, जावें कोठें दूर दिगंतां, परि गृहममता, पाश बिकट हा ! कसा तुटावा; प्रियप्राण**

यत्नें राखावा, म्हणोनि करणें धांवाधांवी, कधिं न विसांवा जिवास ठावा, देवा ! आतां पुरे हाल हे, असें म्हणत मीं नित्य रडावें ॥

बरं इतकी दगदग सोसून रात्रीं तरी कांहीं सौख्य ? तेंही नाहीं.

मींच रात्रि शय्या पसरावी, कष्टविलेली देहयष्टि ही हळूच तिजवर लोटुन द्यावी, जरा कुठें ही दृष्टि मिटावी, तों गतभार्या पुढें दिसावी, नवी बायको करूनि घ्यावी, असें सांगुनि अदृश्य व्हावी. या योगानें चैन पडेना, झोंप न नयना, मनांत नाना येति कल्पना परि गिळुनि त्या तसाचि सारी रात्र कंठितो,—

बरं तुम्ही म्हणाल कीं, इतके हाल होतात तर प्राणत्याग कां करीत नाहीं ? केला असता; तो सुद्धां केला असता; पण त्यांत आत्महत्येचा दोष लागणार !

**भद्रे०**—हो ! आणि ब्राह्मणाची आत्महत्या !

**भुजंग०**—शिवाय—

निपुत्रिकाला नरकवास शास्त्रांत ठरविला, त्याची वाटे भीति मनाला, उपाय याला एकचि उरला, लग्न करावें हांच हाच तो, म्हणोनि म्हणतों, पायां पडतों, द्रव्यहिं देतों लागे तितुकें—

परंतु मला या त्रासांतून वांचवा ! ( **त्याचे पाय धरतो.** )

**भद्रे०**—उठा उठा, भुजंगनाथ उठा ! हें काय हें बायकांसारखं ! तुमचं कुटुंब वारून आज चार वर्षं झालीं. जवळ द्रव्यसंचयही चांगला आहे, लग्नाची इच्छा आहे, मग आजपर्यंत स्वस्थ कसे बसलांत ? यापूर्वींच एखादी मुलगी पाहून—

**भुजंग०**—समजलों; पण स्वस्थ कुठें बसलों होतों ? पुष्कळ मध्यस्थ केले; पण सगळे मूर्ख ! म्हणून आतां तुमच्या भजनीं लागलों आहें. हं ! सांगा. पाहता ना मुलगी ?

**भद्रे०**—पाहतों–पण—

**भुजंग०**—' पण ' कशाला हा मध्यें शंभरदां ! आतां कुठें आडतें आहे तें स्पष्ट सांगानात ?

**भद्रे०**—माझं काय, स्पष्ट सांगतों. द्रव्यांत !

**भुजंग०**—अहो पण, लागेल तितकं द्रव्य देतों, असं मीं मघाशींच तुम्हांला सांगितलं.

**भद्रे०**—आणि तें मीं ऐकलं. तशीच दुसरी गोष्ट या संगमपूरच्या आसपास कांहीं तुम्हांला मुलगी मिळायची नाहीं. कारण खोटेंच का होईना, पण तुम्हीं हे दांत बांधून घेतले आहेत, त्यामुळें म्हणा किंवा दुसऱ्या कांहीं कारणानं म्हणा, तुमच्या म्हातारपणासंबंधानं बोभाटा फार झालेला आहे. यासाठीं दूर एखाद्या ठिकाणीं जावं लागेल. समजा, शंभर कोसांवर जावं लागेल. कबूल ?

**भुजंग०**—अहो, कबूल म्हणून काय विचारतां ! प्रयाग, काशीपलीकडे सुद्धां जायला आम्ही तयार आहों.

**भद्रे०**—बरं, तुम्हांला बायको कशी मिळाली पाहिजे ? म्हणजे रूपानं, वयानं—

**भुजंग०**—( **उत्सुकतेनें** ) खरं सांगू ? अगदीं माझ्या मनाप्रमाणं पाहून देणार असाल, तर सांगतों.

**भद्रे०**—अगदीं तुमच्या मनाप्रमाणं पाहून देतों. सांगा, कशी पाहिजे ?

**भुजंग०**—अशी पाहिजे—

पद्य–( ' मंदस्मित अरविंद ' या चालीवर. )

**सुंदर खाशी सुबक ठेंगणी स्थूल न कृशहि न, वय चवदाची ॥ ध्रु० ॥**
**नयन मनोहर वनहरिणीचे, नाक सरळ जशि कळि चांफ्याची ॥ १ ॥**
**भृकुटि वांकड्या, केश सडक मृदु, दंतपंक्ति ती कुंदकळ्यांची ॥ २ ॥**
**ओंठ पोंवळी, हनु चिंचोळी, लालि गुलाबी गालांवरची ॥ ३ ॥**

**भद्रे०—( स्वगत )** अरे वा: ! हा तर रंगेल म्हातारा दिसतो. **( उघड )** म्हणजे जवळ जवळ रंभाच म्हणा ना ?

**भुजंग०**—नाहीं नाहीं, दीक्षित ? बायको करायची तर अशीच करायची. त्या सुदाम सावकारावर ताण झाली पाहिजे. नाहीं तर काय उपयोग ?

**भद्रे०**—ठीक आहे. तशी पाहून देतों; पण त्या मानानं द्रव्य जास्त लागेल. समजलों ! समजलों ! त्याची तुमच्याकडून तयारी आहेच म्हणतां ? दूरदेशीं जायलाहि कबूल आहांत, आतां इतकंच, कीं जायचं तें सरदारी थाटानं जावं म्हणजे झालं.

**भुजंग०**—तें कशाला ?

**भद्रे०**—कशाला म्हणजे ! सरदारी थाटानं गेलं, म्हणजे कार्यभाग तितका जलद उरकेल, आणखी बायकोही मनाजोगी मिळेल.

**भुजंग०**—हो हो, खरं. तर मग तशा थाटानं जायचं.

**भद्रे०**—पण तशा थाटानं जायचं, म्हणजे तशाच थाटाचा खर्च केला पाहिजे. बरोबर आश्रित, पुराणिक, कारकून, शिपाई, प्यादे, असा लवाजमा पाहिजे. कां " ओय " कां करतां ?

**भुजंग०**—नाहीं, मी म्हणतों, यातायात तर इतकी पडूं नये, आणखी बायको तर सुंदर मिळावी, अशी तोड काढा.

**भद्रे०**—कशाला हो पाहिजे तुम्हांला सुंदर बायको ? इतक्या म्हातारपणीं असली सुंदर बायको पाहिजे कशाला ?

**भुजंग०—( रागानें )** हां हां ! तुमचं अजून लग्नाचं वय आहे, असं मघाशीं तुम्हीच म्हटलंत; आणि आतां तुम्हीच मला म्हातारा म्हणतां ?

**भद्रे०**—अहो, मघाशीं म्हटलं तें थट्टेनं; पण आतां खरं तेंच म्हणजे म्हातारे दिसतां असंच म्हटलं पाहिजे. कारण आतां प्रत्यक्ष माझ्या धंद्याचा संबंध आला.

**भुजंग०**—नाहीं; तसा म्हातारा दिसत असेन थोडा; पण तो या लंग्नांच्या काळजीनं; आतां काय त्याचं? हें आपलं ठरलं, कीं लगेच लागतों तयारीला, आणि पंधरा दिवसांच्या आंत पाहा कसा बनतों राजबिंडा.

**भद्रे०**—( **हंसत** ) ते कसे बनणार सांगा पाहूं?

**भुजंग०**—ऐका—

**पद्य**–( भाषण किती मधुर. )

**पौष्टिक बलवीर्यजनक औषधें अनेक तीं ॥**
**पाक भस्म रस गुटिका सेविन मी वनस्पती ॥ धृ० ॥**
**करिन नित्य दुग्धपान मिष्ट मिष्ट भोजनें ॥**
**मंत्र तंत्र यंत्रादिक अन्य कितिक साधनें ॥**
**ही काया व्यायामें पुष्ट करिन निश्चितीं ॥ १ ॥**

**भद्रे०**—उत्तम ! उत्तमोत्तम ! ! सर्वोत्कृष्ट युक्ति ! मग काय हो !

**भुजंग०**—लग्नाचं ठरलं तर?

**भद्रे०**—पैशाचं ठरलं?

**भुजंग०**—अहो तें ठरलंच आहे. चला याच पावलीं घराकडे चला आणि रक्कम घेऊन लागा तयारीला.

**भद्रे०**—आतां येऊं? ( विचार करून ) पण नको. स्नान करून, संगमनाथाची पूजा आटपून येतों.

**भुजंग०**—मग असंच करा ना! आज एकादशी आहे; मी घरीं जाऊन छानदार निराहाराची तयारी करवितों. फराळालाच तिकडे या म्हणजे झालं.

**भद्रे०**—आहा! म्हणजे पुढचे बेतबात करायला अवकाश यथास्थित सांपडेल.

**भुजंग०**—जातों तर. नमस्कार!

**भद्रे०**—छे छे ! आतां आपण श्रीमंत ! आणि मी श्रीमंतांचा आश्रित. आतां आपण नाहीं असा नमस्कार करायचा. असा नमस्कार करायचा मीं, आणि आपण नुसती अशी मान हलवायची. हें नीट ध्यानांत ठेवायचं बरं ! नमस्कार ! ( **भुजंगनाथ मान हलवून हंसत जाऊं लागतो.** ) श्रीमंत ! हें काय ? किती मोठ्यानं हंसतां ? श्रीमंती हंसणं कसं बेताचं पाहिजे ( **भुजंग० जातो.** ) हें एवढं कार्य आपल्या हातून तडीस गेलं, म्हणजे जन्माची ददात मिटली. धंदा पण धंदा ! यांत संशय नाहीं. आतां या धंद्यांत पाप आहे असें म्हणतात; पण आमच्या संगमनाथाच्या दर्शनाचा असा महिमा आहे कीं, पाप शिलकी राहतच नाहीं. रोजच्या रोज निकाल !

**: श्लोक :**

**प्रातःकाले शिवं दृष्ट्वा, निशीपापं विनश्यति ।**
**आजन्मकृतं माध्यान्हे, सायान्हे सप्तजन्मनाम् ॥**

चला तर, स्नान करून दर्शन घेऊं. ( **शंकर शंकर म्हणत जातो.** )

**( त्याच्या पाठोपाठ कोदंड ओरींतून प्रवेश करून )**

**: साकी :**

**नामें ब्राह्मण, खरा असे हा चांडाळाहूनि पापी ।**
**द्विजत्व ऐशा नीच नराला नकळे विधि कां ओपी ॥**
**ब्राह्मणवर्णाला ॥ कीं हा दुष्टमणि केला ? ॥ १ ॥**

हा अधमा भद्रेश्वरा ! तुझे नांव भद्रेश्वर, पण हीं तुझीं कर्में किती अभद्र ! अरे, परमपवित्र, परममंगल आणि संसारी लोकांना पुरुषार्थांचा लाभ करून देणारा, असा हा विवाहसंस्कार ! आणि त्याची अशी विटंबना करून त्यावर उदरनिर्वाह करतोस ? यापेक्षां—

**पद्य** ( राग—आडाना : त्रिताल. )

**जठरानल शमवाया नीचा ॥ कां न भक्षिसी गोमय ताजें ॥ धृ० ॥**

**धनलोभानें वद आजवरी ॥ किती नेणत्या मूक कुमारी ॥**
**त्वां दिधल्या रे वृद्धवरकरीं ॥ खाटिकही तव कृतिला लाजे ॥ २ ॥**

**हिरण्य०**—मित्रा कोदंडा, ब्राह्मणत्व इतक्या नीच स्थितीला कसं पोंचलं याचंच मला फार आश्चर्य वाटतं !

**कोदंड**—तसाच तो भुजंगनाथ ! अरे भग्नदंता ! पंचमहाभूतांनीं आपापले अंश तुझ्या शरीरांतून बहुतेक आकर्षण करून घेतले, ज्ञानेंद्रियांनीं तुला सोडलं, तुझीं कर्मेंद्रियें शिथिल पडलीं, सर्व चिन्हांनीं युक्त असा जरेचा ध्वज तुझ्या शरीरावर चांगला फडकूं लागला; मृत्यूच्या जड पाशानं तुझी मानहि वांकली, तथापि तुझी कामवासना अद्यापि जागृतच आहे ! आणि ती कामवासना एखादी अल्पवयस्क सुंदर कुमारी विकत घेऊन, तिच्याशीं तूं पूर्ण करणार ! पण अरे विचारांधा ! हें कसं तुझ्या ध्यानांत येत नाहीं ?

**पद्य**–( किती गेले सुकोनी. )

**जो भेद विधीनें स्त्रीपुरुषीं केला ॥ देहींच मात्र तो संतति-कार्याला ॥ १ ॥ परि सुखद वस्तुची आवड उभयांला समसमान दिधली भेद न दाखविला ॥ २ ॥ जशि व्हावी पुरुषा नव सुंदर बाला ॥ पति गुणी देखणा तरुण रुचे स्त्रीला ॥ ३ ॥ हें तत्त्व नेणुनि वरिसि कुमारीला । परि, पशो ! वरुनि तुज सौख्य काय तिजला ॥ ४ ॥**

हिरण्यगर्भा, अशा प्रकारचे विषम विवाह म्हणजे, अकालीं वैधव्य, दुराचार, गर्भपात, बालहत्या, निस्तेज बलहीन संतति, इत्यादि महा अनर्थांचं मुख्य कारण होत.

**हिरण्य०**—परंतु या विघातक, धर्मशास्त्राविरुद्ध, अशा रूढीचा अंगीकार मुख्यतः ब्राह्मणांनीं करून शुद्ध धर्मतत्त्वाला काळिमा लावावा हा केवढा चमत्कार !

**कोदंड**—मला अत्यंत खेद होतो, तो याचविषयीं. हरहर !

पद्य–( मथुरासे शाम गोकुळ णो गये. )

**ये काल कसा विपरीत अहा ॥ निज धर्म लया द्विज नेति पहा ॥ धृ० ॥ तेजोबलधन विहित विवेकी विमलशील ते विप्र कुठें ? ॥ आकुंचितमति मलिन कुठें हे, कुमार्गगामी निंद्य महा ॥१॥**

अशा ब्राह्मणांनीं अंधबुद्धीनं ज्या ज्या भयंकर रूढींचं दास्य स्वीकारलं, त्यांत जरठ-कुमारीविवाहासारखी अति भयंकर रूढी म्हणजे तीच. धर्म, शास्त्र, नीति, व्यवहार, सौख्य, इत्यादि कोणत्याहि दृष्टीनं पाहिलं तरी, ही किती अनर्थकारक आहे पाहा !

पद्य–( निरभ्र शुभ्र नक्षत्र )

**हा जरठकुमारीविवाह शास्त्रें अधमाधम मानिती ॥**
**नरकपात निश्चयें घडविती, तर्कयुक्ति ठरविती ॥ १ ॥**
**हा खरतर मत्सरविषा कालवी स्वजनप्रेमामृतीं ॥**
**कलहानल चेतवी कुटुंबीं, आणि तया अवनती ॥ २ ॥**
**हा शिणल्या कामाग्निला देत नवयुवतींच्या आहुती ॥**
**याचमुळें बापुड्या सहज त्या कुपथें संचारती ॥ ३ ॥**
**हा समाज-हित-घातकी शिकवितो लोकां पशुची कृति ॥**
**करी शिथिल तीं नीतिबंधनें हानि अशानें किती ॥ ४ ॥**

बरं, शास्त्रापेक्षां बलवत्तर झालेल्या या रूढीचा उच्छेद राजानं, धर्मगुरूंनीं, किंवा ब्राह्मणांनीं एकमत होऊन करावा म्हणशील, तर तसंही होण्याचा सांप्रतकाळीं संभव नाहीं. कारण—

: दिंडी :

**अन्यधर्मी भूपाल आर्यभूचा । आर्यधर्मा अनुकूल नसायाचा ॥**
**धर्मगुरु ते निःसत्व दंडधारी । वर्णगुरु ते मनसोक्त कर्मकारी ॥**

याप्रमाणं आमच्या ऐहिक व पारमार्थिक सौख्याचा आधार जो शुद्ध आर्यधर्म, त्याचं तेज, वर उकिरडा वाढलेल्या रत्नाच्या तेजाप्रमाणं, या अशा प्रकारच्या रूढीखालीं आच्छादित झाल्यामुळं सर्वत्र अंधार माजून यादवी सुरू झाली; परिस्थितीविषयीं दुर्लक्ष होऊं लागलं; सर्व दिशांनीं प्रगति कुंठित झाली; प्रतापशाली पूर्वजांच्या प्रौढींत स्वतःचं भान राहिलं नाहीं; ज्ञान तें अज्ञान व अज्ञान तेंच ज्ञान असं भासूं लागलं. आपआपल्यांत भेदभाव वाढत गेल्यामुळं हजारों वर्षांचं राज्यरूपी भव्य मंदिर ढांसळून एकछत्राचे शतशः तुकडे झाले. पूर्वी जगांतील सर्व राष्ट्रांना आपल्या असह्य बुद्धितेजानं दिपवून टाकणारे आम्ही आर्य! तेच शेवटीं त्याच राष्ट्राचे दासानुदास झालों आणि या सर्वांला कारण आमचे आम्हीच!

**हिरण्य०**—मित्रा कोदंडा, गतगोष्टीचा खेद करून काय उपयोग? आमच्या लोकांनीं पूर्वीच्या अनुभवानं तरी नेत्र उघडावेत म्हणून जगद्-गुरूंच्या आज्ञेनं तीन वर्षं त्यांना साधार उपदेश करीत हिंडलास. झालं, तुझं कर्तव्य तूं केलंस, आतां गृहस्थाश्रमाचा स्वीकार करून आनंदांत कालक्षेप करावास हें उत्तम.

**कोदंड**—( **स्वगत** ) आमरण अविवाहित राहण्याचा माझा संकल्प याला कशाला कळवा इतक्यांत. ( **उघड** ) मित्रा, माझाहि मनोदय असाच होता; परंतु या नीच भद्रेश्वराचे आणि त्या निर्लज्ज भुजंगनाथाचे गुप्त बेत ऐकल्यापासून असं वाटतं, कीं आज तीन वर्षं जी निरपेक्ष लोकसेवा केली, तिची सांगता, तो त्यांचा बेत निष्फळ केल्यावांचून होणार नाहीं. म्हणून आतां मी त्या उद्योगाला लागणार.

**हिरण्य०**—परंतु अशानं तुझं स्वतःचं लग्न लांबणीवर पडेल याचा काय विचार केलास?

**कोदंड**—हाच, कीं माझ्या उद्योगाचं फळ मिळाल्यावांचून लग्नच करायचं नाहीं.

**हिरण्य०**—वेडा आहेस ! अरे या काळांत आधीं स्वार्थ साधावा आणि नंतर फावल्यास लोकहिताच्या गोष्टी बोलाव्यात.

**कोदंड**—अरे स्वार्थ तर लागलाच आहे पाठीस, कारण—

पद्य-( रंगैया मनिगे बारानो. )

**स्वार्थी जी प्रीति मनुजाची सहज ती ॥ धृ० ॥**
**परि साधे जो स्वार्थ परार्थी, उत्तम तो गणिती ॥ १ ॥**
**स्वार्थ परार्थाइतुका असतां, मध्यम त्या म्हणती ॥ २ ॥**
**ज्यांत न जनहित त्या स्वार्थाला साधु अधम वदती ॥ ३ ॥**

तेव्हां आपल्याला उत्तम स्वार्थ जरी साधतां आला नाहीं, तथापि मध्यम तरी साधावा.

**हिरण्य०**—मित्रा, काय भ्रम हा ! अरे ज्यानं त्यानं आपलं हित पाहिलं, म्हणजे अर्थात् सर्वांचंच हित साधल्यासारखं झालं. म्हणून सांगतों, तूं हें डोक्यांतलं लोकहिताचं वेड काढून टाक; तरच तुला सुख होईल.

**कोदंड**—हर हर ! माझा प्रिय मित्र हिरण्यगर्भ तो तूंच काय ? असली स्वार्थबुद्धि मला शिकवितोस, म्हणून संशय येतो. अरे, वृद्धानं लहान कुमारीशीं लग्न करूं नये, वृद्धाला कोणी द्रव्यलोभानं कन्या देऊं नये, व असा जरठ-कुमारी-विवाह कुठं होत असल्यास लोकांनीं शक्य तितका प्रयत्न करून तो मोडावा, असा, मीं स्वतः या मुखानं लोकांना उपदेश केला, आणि आज स्वार्थाला गुंतून मींच त्याच्या विरुद्ध आचरण करूं ? काय सांगतोस हें ! अरे—

**: साकी :**

**वाणी तैशी करणी ज्याची श्रद्धा त्यावरि जडते ॥**
**क्रियाशून्य वाचाळावरची असलेलीहि उडते ॥**
**लोकां सांगावें ॥ तैसें स्वयें आचरावें ॥ १ ॥**

पद्य-( कांहे लागोरे )

जरि करिन सकल खलकार्य विफल ॥
मम जन्म विप्रकुलिं तरिच सफल ॥ धृ० ॥
जरि न घडे हें नलगे भार्या ॥
स्वदेह वाहिन हा जनकार्या ॥
स्मरुनि गुरुपदा शपथाचि घेतों ॥
कधिं न ढळे कोदंड अचल ॥ १ ॥

**हिरण्य०**—( **पाठ थोपटून** ) शाबास कोदंडा ! तुझ्यासारखे निग्रही निश्चयी, निःस्पृह, सदाचारसंपन्न, स्वार्थत्यागी, सुविद्य आणि सुविचारी असे पुरुष जेव्हां स्वदेशाच्या सेवेला सज्ज होतील, तेव्हांच त्याचा अभ्युदय होईल. या तुझ्या अलौकिक गुणांवर लुब्ध होऊनच मी स्वतःचं सांसारिक दुःख विसरून तुझा सहवास केला. इतका वेळ बोललों, तें केवळ तुझं मन पाहण्याकरितां बोललों. बरं या कामीं मीं तुला कोणतं साह्य करूं तें सांग.

**कोदंड**—सांगेन, परंतु या प्रश्नानंच, मित्रा, मला किती धैर्य आलं म्हणून सांगूं ! असो; त्या दोघांचा श्रीमंती थाटानं कुठें दूर जाण्याचा बेत झालेला तूं ऐकलासच. आतां ते कोणत्या ठिकाणीं जाणार हें त्यांच्याकडूनच कळलं पाहिजे. दुसरा मार्ग नाहीं. ( **पडद्यांत शंकर ! शंकर ! असा शब्द ऐकून** ) अरे ! हा शब्द कोणाचा बरं ? समजलों. हे ते भद्रेश्वर दीक्षित ! ठीक आहे. तूं ओरीचं दार लावून स्नान करून ये, मी दीक्षितांचीं भेट घेतों. ( **हिरण्यगर्भ जातो.** ) काय या दीक्षितांची झटपट ! इतक्यांत स्नान करून देवपूजेच्या तयारीनं देवालयांत चालले ! केवढी ही शिवनामाची गर्जना ! किती कडकडीत सोवळं ! या सर्व थाटावरून एखाद्याला वाटेल, कीं हा महाशिवभक्त आहे; पण अरे ढोंग्या—

पद्य–( तनु ईंची सुंदरा. )

**जरि वरुनि धुवट सोंवळा, घालिसी गळां, माळा रुद्राक्षांच्या खळा ।। तरि तूं आंत मलिन ओंवळा ।। जरि वरुनि भक्तिचा निधी, अंतरीं कुधी, घेउनि सोंगें लक्षावधी ।। नट तो होईल का नृप कधीं ।। जरि करिशी शिवपूजना, नामगर्जना, तरि मनिं भलत्या रे कल्पना ।। दंभें ठकविसी भोळ्या जनां ।। १ ।।**

असो, याच्यावरची तिरस्कारबुद्धि कांहीं काळ गिळून ठेवली पाहिजे. **( भद्रेश्वराजवळ जातो व नमस्कार करतो. ).**

**भद्रे०**—हं ? कोण ? **शंकर ! शंकर ! शंकर !**

**कोदंड**—मी पांथस्थ आहें, भद्रेश्वर दीक्षित म्हणतात ते आपणच का ?

**भद्रे०**—हं; कां बरं ?

**कोदंड**—त्यांची भेट घ्यायची होती.

**भद्रे०**—त्यांची भेट कां ? तुमचं लग्न व्हायचं आहे वाटतं ?

**कोदंड**—आपण खरं ओळखलंत. माझं लग्न व्हायचं आहे.

**भद्रे०**—तर मग भद्रेश्वर दीक्षित म्हणतात ते आम्हीच. तुम्ही देशस्थ, चित्पावन, का कऱ्हाडे ?

**कोदंड**—मी चित्पावन.

**भद्रे०**—चित्पावन, मग मुली सत्राशेंबावन ! बरं, गोत्र कोणतं ?

**कोदंड**—माझं गोत्र अत्रि !

**भद्रे०**—अत्रि आणि सर्वांशीं मैत्री ! जुळलं. वय दिसतंच आहे तेवीस-चोवीस ! किती सांगा पाहूं ?

**कोदंड**—चोवीस वर्षांचं आहे.

**भद्रे०**—बरं, वडील-मातुःश्री ?

**कोदंड**—दोघंहि मी लहान असतांच वारलीं.

**भद्रे०**—वारलीं ! अरे अरे ! पण एका अर्थी बेष झालं. पोरीला सासू-सासऱ्यांची किटकिट नाहीं उरली. बरं भाऊबहिणी ?

**कोदंड**—नाहीं कुणी.

**भद्रे०**—मग काय, नवरा राजा आणि नवरी राणी ! आतां घरची स्थिति सांगा पाहूं.

**कोदंड**—फार गरिबीची.

**भद्रे०**—फार गरिबीची ! तर मग धरा वाट आपल्या घरची. अहो, तुमच्यासारख्या कफल्लकाच्या गळ्यांत झोळीच्या शेजारीं आपली मुलगी समजून कोण बांधील बरं ! माझा वेळ व्यर्थ खाल्लांत, व्यर्थ. बरं कांहीं विद्या तरी ?

**कोदंड**—म्हणण्यासारखी नाहीं, पण एका पुराणिकबोवांच्या सहवासानं भागवत पाहिलं आहे.

**भद्रे०**—अहो, मीं सुद्धां भागवत पाहिलं आहे, पण पाहून काय उपयोग ? सांगतां येतं का ?

**कोदंड**—होय, सांगितलं आहे दोन-चार वेळ.

**भद्रे०**—असो. काळ्यापेक्षां पिठा दगड बरा. ( **स्वगत** ) आमच्या तात्पुरत्या श्रीमंताच्या पदरीं एक तात्पुरते पुराणिक पाहिजेत, ते आयतेच चालून आले. ( **उघड** ) अहो, तुमची ही अशी दिगंबर ब्रह्मचर्याची स्थिति. तेव्हां लग्नाचा हेतु बाजूला ठेवून एखाद्या श्रीमंताबरोबर यात्रेला याल का ? म्हणजे तुमचं काम सहज होऊन जाईल. बोला आहे पसंत ? संधि आली आहे. लागलीच जुळवून देतों !

**कोदंड**—माझं कार्य होत असेल तर येतों.

**भद्रे०**—पण हें पहा ! श्रीमंतांजवळ रहायचं फार कठीण ! कान असून ऐकायचं नाहीं. डोळे असून पहायचं नाहीं. आपलं काम बरं कीं आपण बरे. आहे कबूल ?

**कोदंड**—हें मी काय सांगूं. आपणच अनुभवानं पहा म्हणजे झालं. पण कोणत्या यात्रेला जायचं हें समजलं तर बरं होईल.

**भद्रे०**—हेंच, हेंच ! तरुण मंडळींचं चुकतं तें हेंच ! पुन्हां एकवार सांगतों. जसं कान असून ऐकायच नाहीं, डोळे असून पहायचं नाहीं, तसंच तोंड असून बोलायचं नाहीं. आतां विसरूं नका बरं. आणि समजा, बोलण्याचा प्रसंग आलाच, तर धोरण पाहून श्रीमंतांना रुचेल तेंच बोलावं. खरं असो, खोटं असो. समजलांत ? या ओरींतच उतरलां आहां ना ? आज सायंकाळीं केव्हां निघायचं तें कळवीन.

**( समोरून, कांहीं मुली येतात त्यांस ' शिवाल, वाट सोडा वाट ' असें म्हणत जातो. )**

**कोदंड**—अरे जंबुका ! कान असून ऐकायचं नाहीं, डोळे असून पहायचं नाहीं आणि तोंड असून बोलायचं नाहीं का ? असो. मनांत आणल्याप्रमाणं इतकं तर जुळलं. पण या वेळेला या इतक्या मुली देवळांत कां ?

**( शारदा, वल्लरी, मंदाकिनी, त्रिवेणी, अशा मुली येतात. शारदा बाजूस होते. )**

**मंदाकिनी**—त्या गेल्याना ? आतां मोकळेपणानं बोलायला कांहीं भीति नाहीं. खरंच सांगा, इतका जख्खड म्हातारा नवरामुलगा कधीं जन्मांत तरी पाहिला होता का ?

**वल्लरी**—भलतंच कांहीं तरी तुझं बोलणं. अग तो म्हणजे चांगला सुरेख, देखणा, तरणा, सगळा सत्तर वर्षांचा नवरदेव ! त्याला का तूं म्हातारा म्हणतेस ?

**कोदंड**—( **स्वगत** ) आमचे भुजंगनाथ कीं काय ?

**त्रिवेणी**—ही शारदा तर लग्नालाच आली होती म्हणा ? पण आम्ही यात्रेच्या निमित्तानं या क्षेत्रीं आलों म्हणूनच हे सुदाम सावकाराचे लगीन-सोहाळे पहायला मिळाले. काय मेला नवरदेव ? त्याचं लगीन झालं, पण बाई त्या पोरीचं पाप उभं राहिलं !

**कोदंड**—समजलों. त्या सुदामाच्या लग्नाची गोष्ट चालली आहे. ही तर ऐकलीच पाहिजे.

**मंदा०**—तुझे बाबा सांगत होते, ऐकलंस का शारदे, सांगत होते, कीं नवरामुलगा बिजवर आहे खरा, पण वयानं कांहीं मोठा नाहीं.

**वल्लरी**—शारदेचे बाबा ना? अग ते सुदाम सावकाराचे आमच्या गांवांतले क्षेत्रोपाध्ये, त्यांना कसा मोठा दिसेल? लहानच दिसायचा. तशांतून त्यांनीं शारदेला चौदा वर्षांची वाढविली आहे, तेव्हां त्यांच्या मनांतून बहुतकरून असाच एखादा पिकलेला तरुण नवरा—पण मी कशाला बोलूं बाई? ( **तिघी रागानें कुजबुजतात.** )

**कोदंड**—काय? या शारदेचं अद्यपि लग्न व्हायचं आहे? आणि तिचा बाप बहुतकरून तिला म्हाताऱ्यालाच देणार, असा या मुलींच्या भाषणांतला अभिप्राय दिसतो.

**जान्हवी**—शारदे, मी म्हणतें हा सुदाम सावकार म्हतारा तो म्हातारा, पण रूपानं तरी बरा असायचा होता. मुंडावळ्या बांधून बसला होता, तेव्हां कसा दिसत होता पाहिलात ना? आहाहा! दृष्ट काढावी बाळाची! तें कुंभकर्णी नाक, ओठांच्या वळकटीवर पडलेले नांगराच्या फाळासारखे ते राक्षसी दोनच दांत, डाव्या डोळ्यांत वाढलेला तो वडस. तें टाकी मारलेलं करपलेल्या आंबोळीसारखं तोंड, आणि वर्ण तर विचारूंच नकोस! काजळाचीं पुटं दिलेला कोळसाच जसा कांहीं! आणि चालत होता कसा पाहिलात का? असा—( **चालून दाखविते.** )

**शारदा**—जाऊं दे. त्या मेल्याची आठवणसुद्धां काढूं नकोस. मंगळाष्टकं झाल्यावर जोश्यानं अंतरपाट काढून घेतलान् तेव्हां होतीस का तूं? होतीस का नर्मदे? काय सांगूं तुम्हांला, नवऱ्यामुलीनं असं वर तोंड करून पाहिलन् मात्र आणि झालं बाई!

पद्य-( जळोग यांचं स्नान. )



**बघुनि त्या भयंकर भूता फोडिली तिनें किंकाळी ॥**
**या हृदया चरका बसला, कळवळे मनहि त्या काळीं ॥**
**परि बाप तिचा तो कसला चांडाळ पूर्विंचा वैरी ॥**
**तिळभरही द्रवला नाहीं उलट त्या बिचारिस मारी ॥**

**ती दीन भयाकुल मुद्रा रात्रंदिन दिसते बाई ॥**
**रडविलें तिनें मज कितिदां दचकतें भिउनि शयनींही ॥ १ ॥**

**वल्लरी**—देवा, नको रे हा मेला पोरींचा जन्म! आपल्या पोटच्या पोरींवर त्या बापाचा हात उचलला तरी कसा म्हणतें मी!

**कोदंड**—शिव शिव! त्या प्रसंगीं मी असतों, तर बरं झालं असतं.

**तुंगा०**—शारदे, आम्हांला कांहीं भीति नाहीं; तूं मात्र संभाळ ग बाई! तुझ्या बापाच्या मनांतुन असंच कांहीं आहे म्हणून माझी आई परवां म्हणत होती!

**शारदा**—भलतंच कांहीं तरी! माझे बाबा असे उलट्या काळजाचे नाहींत आणि कदाचित् त्यांच्या मनांत तसं आलं समज़, तरी पण माझी आई आहे ना!

**मंदा०**—तें सगळं खरं. पण बाई या पैशाच्या पायीं—अग बाई हे कोण?

**कोदंड**—**( पुढें होऊन )** मुलींनो, तुम्ही कोणत्या गांवच्या? भिऊं नका. मी एक पांथस्थ ब्रह्मचारी आहें. तुमचं संभाषण मीं सर्व ऐकलं म्हणूनच विचारतों कीं, तुम्ही कोणत्या गांवच्या?

**( शारदेशिवाय सर्व मुली एकमेकींशीं कुजबुजतात. नमस्कार करतात, हिरण्य स्नान करून येतो त्याच्याशीं कोदंड बोलत उभा राहतो. )**

**शारदा**—**( एका बाजूस उभी राहून )** इतका तरुण, सुंदर असून हा अजून ब्रह्मचारी? मग काय म्हणायचं!

पद्य–( अमृतपानमो )

**जन खुळावले ॥ सकळ उलट चालले ॥ धृ० ॥**
**लग्न करिति जरठ जीर्ण ॥ अविवाहित फिरति तरुण ॥ १ ॥**
**सुख असेल त्यांस त्यांत ॥ परि अमुचें मात्र मरण ॥ २ ॥**

**मंदा०**—**( पुढें होऊन )** महाराज, आम्ही सर्व गंगापुरच्या, आज परत जायचं, म्हणून देवदर्शनासाठीं इकडे आलों.

**कोदंड**—या शारदेच्या बापाच्या मनांतून तिला वृद्ध वराला द्यावयाची आहे, असें हिनं म्हटलं तें खरं का ?

**मंदा०**—हो, असं म्हणतात. मीं सुद्धां ऐकलं होतं हें आणि हें ऐकल्यापासून शारदेला देखील चिंता लागल्यासरखी दिसते. आपण थोर सत्पुरुष आहांत. तेव्हां तिची चिंता दूर होईल असा कांहीं उपाय आपण तिला सांगावा. शारदे जा. त्यांना नमस्कार कर.

**( शारदा नमस्कार करते. )**

**कोदंड**—अनुरूपवरप्राप्तिरस्तु ! शारदे, तूं अगदीं भिऊं नकोस.

**पद्य**—( देव विघ्नेश तारी. दीपचंदी )

**ईश चिंता निवारील सारी ।। भाव निश्चल मनें ठेविं तूं त्यावरी ।। धृ० ।। संकटें शत जरी प्राप्त झालीं ।। सर्व संहारुनी योग्य कालीं ।। करिल कल्याण तो चंद्रमौली ।। पूर्ण विश्वास या विप्रवचनीं धरीं ।। १ ।।**

आतां मी जातों, पण तुम्हां सर्व मुलींना माझं एवढंच सांगणं आहे. कीं—

**पद्य**–( आवो आवो रंगेला. दादरा. )

**जागृत ठेवा, लग्नाची ही स्मृति सारी ।। धृ० ।। व्हालचि माता दुहितांच्या कधिं तरि संसारीं ।। होउं न द्यावा तुम्हीं त्यांचा विक्रय बाजारीं ।। १ ।।** **( जातो. )**

**गाडीवान**—**( येत येत )** गाड्या नदीपल्याड जाऊन शेनी लइ वाड्ळ झाला, चलावं शारदाबाई ! आवं तिरविनीबाई, चला चला बेगी.

**त्रिवेणी**—खरंच का गाड्या नदीपलीकडे गेल्या ? का कांहीं तरीच सांगतो आहेस आपलं ?

**गाडी०**—आ मंजी ! ह्यो बघा दिस डुईवर आला अक्षी. चला बेगी.

**वल्लरी**—अग बाई खरंच ! चला तर, देवदर्शन घेऊन चालायला लागूं या, नाहीं तर त्यांच्याशीं गांठ आहे. बोलून बोलून पुरे करतील अगदीं.

( देवालयांतील गाभाऱ्याचा देखावा. नंदादीप, कर्पूरदीप जळत, आहेत. ब्राह्मण रुद्र वगैरे म्हणत आहेत. अभिषेक चालला आहे. शारदा नमस्कार करून हात जोडून देवास नवस करते. इतर मुली नमस्कार करून प्रदक्षिणा घालूं लागतात. )

शारदा—( हात जोडून )

पद्य–( सारंग : दादरा. )

जय कृष्णातटवासा ।। निजजनभयविध्वंसा ।।
करितें मी नवस असा ।। धृ० ।।
भुलुनि मनीं द्रव्याला ।। मज द्यावें जरठाला ।।
कुमति अशी जनकाला ।। नच झाली तरि तुजला ।।
लक्ष वाती वरसाला ।। लाविन रे गिरिजेशा ।। १ ।।
( सर्व मुली मिळून संगमनाथाची प्रार्थना करतात. )

पद्य–( वंदनैः सुरवृंदार्चितपद : त्रिताल. )

शंभो शिवहर, करुणाकर, हे विश्वेशा, गौरिप्रियकर ।। धृ० ।। अज्ञानी बलहीन अम्ही ।। शरणागत तव चरणां धरि शिरिं करुणायुत कर ।। १ ।। मार्गी आम्हां सर्वपरी ।। हे शशिमौली, तूं सांभाळी जय कालीश्वर ।। २ ।।

---

# अंक २ रा

## प्रवेश १ ला

स्थळः—गंगापुरांतील एक रस्ता.

**दीक्षित**—( **स्वगत** ) या क्षेत्रीं येऊन जवळ जवळ महिना होत आला. इतक्या अवधींत आम्हीं काय केलं ? कां, पुष्कळ केलं. पहिली गोष्ट ही कीं व्यवस्थित वळण बांधून येथील सरकारी हेरंबमहालांत आमच्या श्रीमंतांची स्थापना केली. कांहीं माहिती मिळवून, त्या माहितीला थोडं धोरण जुळवून आणि त्यांत आमची स्वतःची कल्पना मिसळून श्रीमंतांना शोभण्यासारखं व लोकांना पटण्यासारखं एक नांव शोधून काढलं. तें कोणतं ? तर मंडलेश्वरकरांचे सापत्न बंधु जयधुंडिराज. या क्षेत्रीं आल्या दिवसापासून, विद्वान्, शास्त्री, हरिदास, पुराणीक, अशांची योग्य संभावना; तसेंच दानधर्म, अन्नसंतर्पण, इत्यादिकांची गर्दी सुरू ठेवल्यानं श्रीमंतांच्या औदार्याचा चोहोंकडे डंका झडूं लागला. हें सर्व झालं, पण मुख्य कार्यासंबंधानं काय झालं ? कां बरं ! त्या दिशेनंहि या दीक्षितांच्या युक्तीचा जयच होत चालला आहे. श्रीमंत वृद्ध नसून तरणे आहेत, असा लोकांचा ग्रह केला. रूपानं, वयानं, आपल्याला हवी त्यापेक्षां रेसभर जास्त अशी कांचनभट म्हणून एका लोभी भिक्षुकाची लग्नाची मुलगी आहे, असा शोध काढला. त्या कांचनभटाचे स्नेही सुवर्णशास्त्री-त्र्यांचे गुण पाहून मग नांवं ठेविलेलीं दिसतात. त्या शास्त्र्यांच्या मध्यस्थीनं कांचनभटाचं मन वळविण्याचं कारस्थान सुरू केलं आहे. मुलगी दिल्यास हुंडा म्हणून पांच हजार; शिवाय त्या भटाला श्रीमंतांचे श्वशुर म्हणून वंशपरंपरेनं मोठीशी तैनात करून देऊं असं आमिष दाखवायला सांगितलं आहे. हजार वाटांनीं ही गोळी चुकायची नाहीं. इकडे श्रीमंतांना तर लग्नाचं जसं कांहीं वेडच लागलं आहे. अष्टौप्रहर लग्नाशिवाय

गोष्ट नाहीं दुसरी. त्यांचा प्रश्नहि लग्नच, आणि उत्तरहि लग्नच. ( दूर पाहून ) हे सुवर्णशास्त्री कांचनभटाच्या घराकडून आले. बहुधा यश संपादन करून आले असतील. चला, त्यांनाच विचारूं म्हणजे झालं. ( **जातो.** )

---

## प्रवेश २ रा

**स्थळः**—कांचनभटाचें घर.

**शारदा**—( मनाशीं विचार करीत ) खरोखरीच,

**पद्य**–( हिंगण दिपची पद्मिण हिंडती. धुमाळी. )

**बाळपणींचा काळ सुखाचा, आठवतो घडि घडी ॥**
**तशि नये फिरून कधिं घडी ॥ धृ० ॥ किती हौसेनें**
**टाकिलि असती त्यांत मागुती उडी ॥ परि दुबळी**
**मानवकुडी ॥ चाल ॥ मनिं नव्हति कशाची चिंता ॥**
**आनंद अखंडित होता ॥ आक्रोश कारणापुरता ॥**
**जें ब्रह्म काय तें मायबाप ही जोडी ॥ खेळांत काय ती गोडी ॥१॥**

पण तो काळ हां हां म्हणतां निघून गेला आणि हा मेला काळजीचा काळ येऊन मानेवर बसला. आतांशीं तर मानाला जसे कांहीं विंचू डसून राहिले आहेत. ( **इतक्यांत वल्लरी येते** )

**वल्लरी**—काय चाललं आहे इंदिराकाकू ? वेणीफणी झाली का ?

**शारदा**—( **सानंद** ) या तुम्ही वल्लरी आक्का ! आज कुणीकडे आलं हें उंबराचं फूल ?

**वल्लरी**—अगबाई तूंच का शारदे ! केवढी मोठी दिसायला लागलीस ! अशी पाठमोरी उभी होतीस, मला वाटलं इंदिराकाकूच उभ्या आहेत !

**शारदा**—असं वाटलं का ? आणखी नाहीं का कांहीं वाटलं ?

**वल्लरी**—वाटलं असतं, पण उपयोग काय वाटून ? कायससं म्हणतात तें ' ठिकाण नाहीं लग्नाला, आणि कोण घेईल मुलाला. ' बरं इंदिराकाकू कुठें आहेत ? त्यांना अन् तुला हळदीकुंकवाला बोलवायला आलें आहें. आमच्या चंद्रिकेला आज पहांटे मुका मुलगा झाला हो !

**शारदा**—होय का ? बरं झालं बाई ! पण हें लवकरच नाहीं का झालं ? माझ्यापेक्षां पांच-सहा महिन्यांनीं चंद्रिका लहान असं आई सांगत होती.

**वल्लरी**—हो, मग लवकर कसलं ! हा चैत्र चालला आहे ना ! झालं तर. वैशाखांत तिला चौदावं लागतं. आणि तूं हिच्यापेक्षां पांच सहा महिन्यांनीं मोठी ! पण तुझ्या बाबांना तूं अगदीं चिमुकलीच दिसतेस, म्हणून वाटतं अजून स्वथ बसले आहेत ? सांभाळ ग बाई ! नाहीं तर मेलं— पण मीच एकदां येऊन इंदिराकाकूंना विचारणार आहें. उशीर झाला. जातें आतां. काकू आल्या म्हणजे सांग बरं का ! ( **जाऊं लागते.** )

**शारदा**—अग पण हो, कुंकू तरी लावूं दे. (**करंडा आणण्यास जाते.**)

**वल्लरी**—( **स्वगत** ) खरंच, ही आधींच उफाड्याची, त्यांतून चौदावं वर्ष लागलेलं आणि लग्नाला तर अजून ठिकाण नाहीं. काय होणार आहे कुणाला ठाऊक. ( **शारदा येऊन कुंकू लावते** ) येतें बरं का आतां. ( **जाऊं लागते.** )

**शारदा**—अशीच कधीं कधीं पायधूळ झाडीत जा. पण अगदीं घोड्यावरूनच नको बरं का ? ( **वल्लरी जाते.** ) या माझ्यापेक्षां लहान मुलीसुद्धां न्हात्याधुत्या होऊन चांगल्या संसार करायला लागल्या आणि मी अजून अशीच बसलें आहें ! बाबांच्या मनांत आहे तरी काय ? आम्हांला कुणाजवळ उघड बोलतां येत नाहीं. म्हणून समजायचं का राहील ? चंद्रिकेचं व्हायचं तसं झालं पण तें कळल्यापासून मनांत एकसारखा विचार येऊन मला बाई भय वाटायला लागलं आहे. देवा !

पद्य-( सखयांनो दाखवागे )

**कधिं करिती लग्न माझें तुज ठावें ईश्वरा ।। धृ० ।।**
**वाढली उंच ही किती ।। हंसुनी बोलती ।।**
**नाक मुरडिती ।। स्त्रिया परभारां ।। १ ।।**
**मैत्रिणी वदति टोंचुनी ।। शब्द ते मनीं ।।**
**जाति भेदुनि ।। सुरीच्या धारा ।। २ ।।**
**जनक तो नांव काढिना ।। माय सुचविना ।।**
**हौस मग कुणा ।। कोण झटणारा ।। ३ ।।**

तें गंगेवर अंग धुयायला जाणं नको, मुलींशीं खेळणं नको, गाणीं शिकणं नको, देव नको, कांहीं नको, असं वाटायला लागलं आहे.

**( इंदिराकाकू गंगेवरून अंग धुऊन येतात. )**

**इंदिरा०**— शारदे, आज तुला मुचकुंदांच्या घरीं कुंवारीण जायचं आहे. जा लौकर अंग धुऊन ये.

**शारदा**— आई मी नाहीं बाई जात कुंवारीण. उगीच थोरी पोरी, तोंडाला येईल तसं बोलतात. मला वाईट वाटतं मग.

**इंदिरा०**—हा मेल्यांनो ! त्या काय म्हणून बोलतात ? त्यांचं तूं घोडं का मारलं आहेस ? आणि तसं वाईट वाटण्यासारखं बोलतात तरी काय ? अजून लग्न कां करीत नाहींत हेंच ना ? आज असं जी कोण विचारील तिला म्हणावं ' होय, मला जन्मभर कुंवार ठेवणार आहेत. त्यांत तुमचं काय खरचतं ? ' घरोघर मातीच्याच चुली म्हणावं. न्हाण आल्यावरसुद्धां लग्नं झालेल्या पोरी जगांत का थोडया सांपडतील ? पण दुसऱ्याच्या रिकाम्या उठाठेवी करायची इथल्या बायकांना संवयच. जातांना तो दरवाजाबाहेर जयंत खेळतो आहे, त्याची अंगरखा टोपी घेऊन त्यालाहि येऊन जा. आज सोमवार आहे. पण त्याला डुंबूं देऊं नकोस हो फार.

**शारदा**—**( जात असतां परतून )** पण खरंच आई, तूं अंग धुवा-

यला गेली होतीस तेव्हां चंद्रिकेला न्हाण आलं म्हणून वल्लरी हळदी-कुंकवाला बोलवायला आली होती.

**इंदिरा०**—तरी म्हटलं वाजत होतं काय ?

**शारदा**—पण आई, चंद्रिका माझ्यापेक्षां पांच-सहा महिन्यांनीं लहान ना ग ?

**इंदिरा०**—तूं अशी बोलत उभी राहूं नकोस. अंग धुवायला जा कशी. दुसऱ्याच्या घरीं जेवायला जायचं, तें आपलं वेळेवर गेलं म्हणजे बरं, **( शारदा भावाला हांक मारीत जाते. )** हें हिनं कशा अर्थानं विचारलंन, तें मला कळत का नाहीं ? पण करायचं काय ? मनांतल्या मनांत जळफळावं आणि स्वस्थ बसावं झालं. हे आमचे पुरुष म्हणजे—

**कांचनभट—( बाहेरून येऊन )** जयंता, अग शारदे !

**इंदिरा०**—ती आतां इतक्यांत जयंताला घेऊन गंगेवर अंग धुवायला गेली आहे.

**कांचन०**—पण तूं आहेसना ? झालं तर. अशी इकडे ये पाहूं.

**इंदिरा०—( दाराशीं येऊन )** ही आलें. कां ?

**कांचन०**—मला किती दिवस एकसारखीं टुमणीं लावलीं होतीस कीं पोरगी वाढत चालली, तिला स्थळ नाहीं का बघायचं, लोक हंसतात; असन् तसं, एक हजार गोष्टी. तेव्हां मी तुला काय सांगत होतों कीं, आमची शारदा मोठी दैववान् पोरगी आहे; तिचा नवरा आपोआप घरीं चालून येईल; तूं कांहीं काळजी करूं नकोस. असं सांगत होतों ना ?

**इंदिरा०—( आनंदानें )** तसं आज कांहीं झालं आहे वाटतं ? खरंच आला आहे का कोणी ?

**कांचन०**—आला आहे ? लोटांगणं घालीत येईल लोटांगणं ! आमची मुलगीच तशी आहे ! बरं पण तूं सांग, कीं तुझ्या अगदीं मनाप्रमाणं म्हणजे जांवई कसा असावा ?

**इंदिरा०**—मी काय सांगायचं त्यांत ! इकडे पसंत पडला म्हणजे झालं !

**कांचन०—( तिचे शब्द उच्चारून )** मी काय सांगायचं त्यांत. इकडे

पसंत पडला म्हणजे झालं ! हें हंसत हंसत आतां म्हणतेस, पण मग लागशील धुसपुसायला ! तें नाहीं खपायचं. मी असं म्हणतों कीं, सून पसंत करावी सासऱ्यानं आणि जांवई पसंत करावा सासूनं. कां असंच कीं नाहीं ? त्यांतून तुझ्यासारख्या शहाण्या चतुर सासूनं पसंत केल्यावर, तो जगाला पसंत झाला म्हणून समजावं. लाजूं नकोस खरं म्हणतोंना मी ? नाहीं तर हा आपला आमचा संबंध !

**इंदिरा०**—ती गोष्ट कशाला आतां ? पदरीं पडलं, पवित्र झालं. त्यांतून मनांत असेल तर दुसरं लगीन करून घ्यायला हात का धरला आहे कुणी ? मला आनंदच आहे त्यांत !

**कांचन०**—अरे रागावली ! थट्टासुद्धां समजत नाहीं हिला. अजागळ रे अजागळ ! अशी बाहेर ये, आणि जांवई कसा पाहिजे तें मन मोकळं करून सांग.

**इंदिरा०**—खरं मनापासून विचारायचं असलं, तर सांगतें. आणि थट्टाच करायची असेल तर माझी एकटीचीच कांहीं मुलगी नव्हे ती, इकडेहि तिच्या बऱ्याची काळजी असलीच पाहिजे.

**कांचन०**—कसं गोड ! गोड !! गोड !!! बोललीस. मी तुला शहाणी, समंजस म्हणतों तें उगीच नव्हे. अग दोघांची आहे, म्हणूनच दोघांच्या विचारानं जो ठरेल, तो जांवई पसंत करायचा. म्हणून तर आजपर्यंत लग्न लांबलं. हं, बोल उशीर होतो.

**इंदिरा०**—अगदीं खरं सांगूं ? अगदीं माझ्या मनाजोगं ? तर माझ्या शारदेला बिंदी, बिजवरा, तन्मणी, कंठा, चंद्रहार, घालणारा असा पालखीपदस्थ नवरा पाहिजे. ‘ हो ’ ‘ हो ’ नको करायला. माझी म्हणून उगीच कांहीं तरी म्हणतें असं नव्हे. माझी शारदा आहेच तशी !

**पद्य**-( राहेना गोविंद राधे. )

**जरी कुणा श्रीमंताची सून होय शारदा ॥**
**तरी त्यास साजे ऐशी तिची रूपसंपदा ॥ ध्रु० ॥**
**बघुनि तीस आकाशींची चांदणी दिपावी ॥**
**नाहिं रूपवंती दुसरी हजारांत ठावी ॥**

**हंसत थोर सरदारांनीं मागणी करावी**
**परि मला मनचे मांडे चुरुनि काय फायदा ॥ १ ॥**

**कांचन०**—इतकी जर तुझी शारदा उत्तम आहे, तर मग मनचे मांडे कां म्हणतेस? हें अशक्य आहे, असं तुला वाटतं का?

**इंदिरा०**—हो अशक्यच नाहीं तर काय? असं स्थळ मिळायला हुंडा किती भरावा लागेल? आणि इकडचा सूर्य तिकडे उगवला तरी इकडून कांहीं पैसुद्धां सुटायची नाहीं. म्हणून मनचे मांडे म्हणायचे.

**कांचन०**—आणि माझ्या सुदैवानं हुंडा न भरतां असं स्थळ मिळालं तर?

**इंदिरा०**—मिळालं तर कांहीं मोठंसं नवल नाहीं. माझी शारदा आहेच तशी. तिच्यावरून श्रीमंतांच्या गोऱ्यागोमट्या पोरी अशा ओवाळून टाकाव्यात. राजाला सुद्धां राणी शोभायची! पण ब्राह्मणाची म्हणून इलाज नाहीं.

**कांचन०**—हो हो! आहेच तशी. यांत काय संशय, आणि म्हणूनच आपण हुंडा न भरतां, उलट मुलीला हुंडा देणारं पालखीपदस्थाचं स्थळ मिळालं तर मग कसं काय?

**इंदिरा०**—मग काय? दुधांत साखर पडल्यासारखं झालं. उपाशी मागतो भाकर शिळी आणि देव देतो साखरपोळी. पण ही सगळी थट्टा दिसते आहे मला.

**कांचन०**—आणि शिवाय आम्हांला वर्षांची पांचशें रुपयांची नेमणूक! ऐकलंस का? श्वशुर म्हणून!

**इंदिरा०**—आतां मात्र ही खास थट्टा. नाहीं तर एखादं मेलं श्रीमंत थेरड्या म्हाताऱ्याचं तरी स्थळ असेल. तसं असेल तर नाहीं हो द्यायची माझी मुलगी तसल्या म्हाताऱ्याला!

**कांचन०**—तूं द्यायची नाहींस, आणि मी देईन का? माया काय ती तुम्हांलाच वाटतं? बरं पालखीपदस्थाचं स्थळ तर तुला पसंत आहे हें तुमचं आमचं जुळलं. आतां वयानं, रूपानं, गुणानं, जांवई कसा असावा, तें सांग म्हणजे झालं.

**इंदिरा०**—श्रीमंतीनं असा, आणि गुणानं, रूपानं, वयानं माझ्या मनाजोगा जांवई मिळाला, नर कुळस्वामिनीला बत्तीस पुतळ्यांची माळ करून वाहीन.

**कांचन०**—पण तुझ्या मनाजोगा म्हणजे कसा ? तें तरी सांग म्हणजे सहज त्यांत तुझीहि परीक्षा होईल.

**इंदिरा०**—होईना बापडी. पण माझी हौस म्हणजे—

**पद्य**–( माळिण नवतरणी. )

**तरुण कुलिन गोरा, हंसतमुख, तरुण कुलिन गोरा ।।**
**पाहिजे मुलीला चतुर सद्‌गुणी सुंदरसा नवरा ।। ध्रु० ।।**
**चाल ।। पुरवील तिची जो हौस सदा बहुपरी ।।**
**घालील शाल जो मायेची तिजवरी ।।**
**तिळमात्र तिला जो दुःख न देईल घरीं ।।**
**विद्वानांत हिरा, चकाकत, विद्वानांत हिरा ।। १ ।।**

**कांचन०**––शाबास ! शाबास ! ! शाबास ! ! ! हे तुझे माझे विचार कसे जुळले म्हणतेस ! अगदीं बरोबर ! वाहवा ! लग्न झाल्यापासून असा हा आजचाच पहिला योग.

**इंदिरा०**––हो कधीं विचारायचं नाहीं, मग योग तरी मेला कसा यावा ?

**कांचन०**––बरं आजच्यानंच कांहीं झालं नाहीं. पण कसा असावा म्हटलंस ? कुलीन, हंसतमुख, सुंदर, पसंत ! पसंत ! अगदीं पसंत ! आणखी कसा ? चतुर असावा, हौशी असावा, वा ! या खुब्या बायकांनाच कळायच्या. विद्वान्, माया करणारा, पोरीला दुःख न देणारा, अगदीं योग्य ! पण गोरा असावा म्हटलंस कीं नाहीं इथें मात्र अगदीं घसरलीस. आपल्या शारदेला काळासांवळाच नवरा पाहिजे म्हणजे उत्तम मेळ बसला. तो तुमच्या आमच्यांत नाहीं म्हणून तर वरचेवर चकमकी झडतात. हा अनुभव असून जर आम्हीं तोच प्रमाद पुढं केला, तर त्यांत काय शहाणपण ? म्हणून म्हणतों कीं––

पद्य–( असा कोणरे मदन तो, )

**सांवळा वर बरा गौर वधुला ।। नियम देवादिकीं हाचि परि-पाळिला ।। धृ० ।। गौर तनु जानकी राम घननीळ तो ।। रुक्मिणी गोरटी कृष्ण काळा ।। शुभ्र गंगा नदी सागराला वरी, वीज मेघास ती घालि माळा ।। १ ।।**

**इंदिरा०**—असो म्हणा, नाकाडोळ्यांनीं चांगला असून तरुण असून जर थोडा काळासांवळा असला, तर मग माझा कांहीं फारसा आग्रह नाहीं.

**कांचन०**—नाकाडोळ्यांनीं चांगला पाहिजे हें तुझं म्हणणं आम्हांला कबूल. पण तरुण म्हणजे काय? तेवीस-चोवीस वर्षांचा कोंवळा पोरगा! ही तुझी आवड मला बिलकुल पसंत नाहीं. अग, चोविशीचा सुमार म्हणजे पुरुषांच्या मूर्खपणाचा सुकाळ! हें सुद्धां माहीत नसावं तुला?

: पद्य :

**अगदिंच तूं वेडी ।। वयांत या अविचार मदादिक पुरुषां बहु खोडी ।। १ ।। बघसि न दूरवरी ।। स्वयंमन्य ते, व्यसनी, चंचल, बोधाचे वैरी ।। २ ।। म्हणसी मी शहाणी, सांग टाकिल्या अशा पिशांनीं रडति किती तरुणी ।। ३ ।।**

**इंदिरा०**— हें मात्र खरं ग बाई! परवां त्या यज्ञदेवांच्या मुलीचं असंच कायसं झालं म्हणे!

**कांचन०**—मग! सांगतों काय तुला? म्हणून म्हणतों कीं, आमच्या शारदेला कमींत कमी निदान तीस वर्षांचा, शान्त, पोक्त, विचारी असा नवरा पाहिजे म्हणजे सर्वमान्य असा संबंध झाला. तिसांपेक्षां चार-पांच वर्षं जास्त असलीं तर उत्तमच. म्हणजे काय? हें मी पदरचं नाहीं सांगत; शास्त्रच आहे असं. ऐक—

" चतुर्दशवर्षकन्यां पंचतीसोत्तमो वराः "

म्हणजे चौदा वर्षांच्या मुलीला पसतीस वर्षांचा वर उत्तम. आणि आपल्या पोरीचं वय तितकंच आहे.

**इंदिरा०**—म्हणजे माझ्या पोरीला पसतीस वर्षांचा नवरा? नको ग बाई! जाळा तीं तुमचीं शास्त्रंन् ते अनुभव.

**कांचन०**—हेंच तें, धोरण कमी म्हणतों तें हेंच! शास्त्रवचन सांगितलं तुला. बरं, अजून पोरगी कशी येत नाहीं? आतां तिला पहायला ते दीक्षित यायचे आहेत.

**इंदिरा०**—खरं कीं काय! अग बाई! मी म्हणत होतें, तसे जर पोरीच्या अंगावर दोन दागिने करून ठेवले असते, तर नसते का बरं आज उपयोगी पडले? म्हणजे तितकीच अम्मळ जास्त ह्यानं दिसली असती.

**कांचन०**—तेंच, तेंच. एकंदरींत धोरणच कमी. अग, आपल्या शारदेला दागिन्यांनीं का शोभा यायची आहे? हे दागिने कुरूपाला सुरूप करतात, पण सुरूपाला कुरूप करतात. ही आली पाहा.

**इंदिरा०**—आलीस का? ( **शारदा बाहेर येते** ) अहाहा! काय नेसली आहेस पण? ते वेणीचे केस विसकटले आहेत? इकडे ये आधीं माजघरांत. मी ते नीट करतें. आज तुला पहायला यायचे आहेत. समजलीस का?

**जयंत**—( **धाईनें येऊन** ) बाबा, बाबा, आज नदीवर किनई एक बाई आंघोळीला आली होती. तिच्याबरोबर किनई आक्का भांडत होती हो.

**कांचन०**—होय ग शारदे?

**शारदा**—छे छे! मी कशाला भांडायला जाऊं. जयंत मुंजीला मोठा झाला, आणि तुझे बाबा त्याची मुंज कां अजून करीत नाहींत म्हणून मला एका बाईनं विचारलंन्, तेव्हां यंदा करणार आहेत म्हणून मीं सांगितलं तिला.

**जयंत**—नाहीं हो बाबा. खोटं बोलते ही. ती बाई किनई मला म्हणाली बाबांना विचार आक्काचं लगीन कधीं करणार म्हणून. मग-मग आक्का मोठमोठ्यानं भांडली हो तिच्याशीं! म्हणाली—

**( इतक्यांत एक शिपाई येऊन दीक्षित आले आहेत असें कांचनभटास सांगतो. शारदा आंत जाते. )**

**कांचन०**--( **गडबडीनें उठून** ) खरं कीं काय ? अग ए, दीक्षित आले. तेवढा तो गालीचा आण आधीं. ते आले बघ. नाहीं तर दोन पाट तरी घे.

**( गालीचा आणून देते. तो गडबडीनें पसरतो. दीक्षित, शास्त्री येतात, नमस्कारादि आदरसत्कार होतो, सर्व बसतात. )**

**सुवर्ण०**--भटजी, दीक्षितांचा तुम्हांला परिचय नाहीं. फार थोर ! फार योग्य ! महा विभूति आहे.

**कांचन०**—प्रसंगाशिवाय परिचय होत नाहीं, आणि परिचयाशिवाय परीक्षा होत नाहीं. कां, असंच कीं नाहीं दीक्षित ?

**दीक्षित**—असं पहा, सूर्याच्या तेजानं चंद्र प्रकाशमान होतो, त्यांत त्या चंद्राची काय प्रशंसा करायची ? एका अर्थी श्रीमंतांच्या छत्राखालीं आम्ही आहोंत, तेव्हां थोरच म्हणायचे. शास्त्रीबुवा असाचना अर्थ घ्यायचा ?

**सुवर्ण०**--हो, असा घेतला तरी माझ्या विधानाला कांहीं बाध येत नाहीं. याला दृष्टान्त, उत्तम हिरा सुवर्णकोंदणांत असला म्हणजे त्याचं तेज वाढतं हें खरं, परंतु तो स्वतः तेजस्वीच असतो. कां भटजी ?

**कांचन०**—वास्तविक आहे. इंद्रावांचून सुरगुरूला महत्त्व नाहीं आणि सुरगुरूवांचून इंद्राला नाहीं !

**दीक्षित**—कशाचे सुरगुरू आणि कशाचे हिरे. थोरांनीं लहानांची प्रतिष्ठा वाढविली म्हणजे वाढते, इतकाच त्यांतला ग्राह्यांश. असो, शास्त्रीबुवा--

**( संज्ञा करतो. शास्त्री भटजीच्या कानांत सांगतो. )**

**कांचन०**—जयंता, जा बाळ तुझ्या आक्काला घेऊन ये.

**शास्त्री**—मुलगी काय हिरकणी आहे हिरकणी ! आपली शिष्टरूढी आहे म्हणून पहायची, खेरीज भटजींच्या घरचं वळण म्हणजे शुद्ध बाळबोध ! मोठमोठ्यांनीं कित्ता घेण्यासारखं ! भटजी, मी मिथ्या प्रशंसा करीत नाहीं. वस्तुस्थिति विदित केली.

**भटजी**—कशाचं कशाचं ! आपलं गरिबी जुन्या चालीचं वाडवडिलांनीं घालून दिलेलं संभाविती वळण घटवीत बसलों आहोंत झालं !

**दीक्षित**—म्हणजेच उत्तम. नाहीं तर मुलगी देखणी, आणि घरची चालरीत नाहीं, काय उपयोग !

**जयंत**—( **शारदेस बाहेर ओढीत** ) आतां कां, आतां कां येत नाहींस बाहेर ? बघा हो बाबा ही येतच नाहीं. आई सांगते तरी येत नाहीं. लाजून उभी राहिली आहे, हात् तशी ! मला लाजरा म्हणतेस नाहीं का ! आतां कसं ! चल चल !

**भटजी**— जयंता, सोड तूं तिला. शारदे, ये अशी.

**( येऊन, सर्वांना नमस्कार करून भटजीजवळ बसते. )**

**शास्त्री**—मुली, तुझ्या नांवाचीं अक्षरं किती आहेत ?

**शारदा**—तीन.

**शास्त्री**—पहिलं काय ?

**शारदा**—शा.

**शास्त्री**—तिसरं काय ?

**शारदा**--दा.

**शास्त्री**--बरं आतां मधलं अक्षर प्रथम घालून एका देवाचं नांव घे पाहूं.

**शारदा**--रमाकांत !

**दीक्षित**--शाबास, हुशार आहेत. पण शास्त्रीबुवा, नांव विचारण्याची ही नवीनच क्लृप्ति काढलीत.

**शास्त्री**--आपला त्यांतल्या त्यांत विनोद ! बरं शारदे, जयंत हा भटजींचा कोण ?

**शारदा**--त्यांचा मुलगा, माझा धाकटा भाऊ.

**दीक्षित**--बरं भटजी, मुलीचं टिपण आहेना ? ( **आणतों म्हणून कांचनभट उठून जातो.** ) तुम्हांला लिहितां वाचतां येतं का ?

**शारदा**--बालबोध येतं.

**दीक्षित**--कुणीं शिकविलं ?

**शारदा**--मामानं शिकविलं !

**जयंत**—आणखी गाणीं छान म्हणते हो. आईनं तिला एक म्हाताऱ्याच्या लग्नाचं गाणं शिकविलं आहेन्. कसं छान आहे. त्यांत त्या म्हाताऱ्याची बायकोच पळून गेली आहे आक्का म्हणतेस का तें ?

**शास्त्री**—आहे, मुलगा धीट आहे चांगला. आणखी काय काय येतं रे तुझ्या आक्काला !

**जयंत**—आक्का गाणीं करते, येवढी मोठी पोथी वाचते.

**शास्त्री**—आणि तुला नाहीं का कांहीं येत ?

**जयंत**—मला नाहीं येत कांहीं. **( भटजी पत्रिका आणून देतो. )**

**दीक्षित**--**( टिपण पहात )** उत्तम ! यांचा देवगण, श्रीमंतांचा देवगण. यांची आद्यनाडी, आणि श्रीमंतांची अंत्य नाडी. भटजी, पत्रिका उत्तम आहे. शुभग्रह बलवान् ! षडाष्टक खडाष्टक कांहीं नाहीं. बरं भटजी, गोत्र ?

**भटजी**—आमचं गोत्र काश्यप. तें पत्रिकेंत आहेच.

**दीक्षित**—**( श्लोक पुटपुटत स्वगत )** गोत्र पटत नाहीं, सगोत्र होतं. आतां ? आतां काय, सगोत्र होतं म्हणून सोडायचं नाहीं. भुजंगनाथाची श्रीमंती जशी उसनी, तसं गोत्रहि उसनं घेतलं म्हणजे झालं. या प्रसंगीं ही युक्ति लढवलीच पाहिजे. **( उघड )** भटजी. जुळलं मला मोठी काळजी होती. शारदाबाई, या. गोरख, तुझ्याजवळ दिलेलं बासन आणि ते पुडे आण **( आणून ठेवतो. )** शारदाबाई ही शेलारी, हा चोळीचा खण आणि हा खाऊचा पुडा तुम्हांला. आणि जयंता, हा तुला ! **( देतो ) ( शारदा नमस्कार करून तें घेऊन जाते. जयंत, ही घे अक्का पिंवळी बर्फी, असें म्हणत नाचत जातो. )** मग कसं काय भटजी ? श्रीमंतांच्या संबंधानं शास्त्रीबुवांनीं तुम्हांला सांगितलंच आहे. हा संबंध ठरला असं मानायला कांहीं चिंता नाहीं ना ?

**भटजी**—चिंता नाहीं, परंतु एकदां आंत जाऊन विचारून येतों.

**शास्त्री**—**( हळूच )** हें ढोंग आहे. उगीच चंद्रबळ आणतो आहे झालं.

**दीक्षित**—तें मीं ओळखलंच, पण बायको विघ्न आणण्यासारखी

नाहींना ? एरवीं पोरीवर उंची जडावाचे दागिने पडायचे आहेत, तेंव्हां तसं करायची नाहीं; पण न जाणों.

**शास्त्री**—आणि विघ्न आणायलाच लागली तर, तिलाहि एखादा ठसठशीतसा दागिना द्यायचा केला म्हणजे पडते समजूत. कारण बायकांचं वर्म म्हणजे दागिने. ( **भटजी येतो** ) कां भटजी पडला का रुकार ?

**भटजी**—पडलाच म्हणायचा, पण एकवार श्रीमंतांना पाहून येण्याचा आग्रह आहे. बायकांची समजूत, मीं सांगितलं पाहून येतों म्हणून.

**दीक्षित**—कांहीं वावगं नाहीं. चला तर, का शास्त्रीबुवा ?

**शास्त्री**—हो, म्हणजे शिष्टाचारहि झाला, आणखी शंकानिरसनहि झालं. त्यांतून आंतली शंका ! हो—

**कांचन०**—शास्त्रीबुवा, तुम्ही जरा आंत येऊन चला.

**दीक्षित**—बरं तर. शास्त्रीबुवा, तुम्हीच यांना घेऊन या. मी पुढें होतों. **( नमस्कार करून गोरखास हांक मारतो व चार पावलें पुढें होऊन )** हा भट आतां आमच्या नकली श्रीमंतांना पाहणार म्हणजे करणार तरी काय ? मोठी पंचाईत आली. तेवढी वेळ मारून नेली पाहिजे. म्हणजे बहुतेक निर्धास्त झालों. चला, त्यांची नक्कल नीट पढवून ठेवूं. नाहीं तर करायचे घोंटाळा.

---

# प्रवेश ३ रा

**( हेरंबमहालांतील दिवाणखाना. श्रीमंत एकटे बसले आहेत. )**

**श्रीमंत**—साऱ्या जन्मांत स्वसंतोषानं अशी मी कुणाला एक बोटभर चिंधी, किंवा तांब्याचा तुकडा, किंवा घांसभर अन्न दिलेलं मला स्मरत नाहीं. तोच मी भुजंगनाथ, या पंधरा दिवसांत, हा भद्रेश्वर सांगेल त्याला सांगेल तें, आपल्या हातांनीं, घ्या घ्या म्हणून देतों. अमका आला अमुक द्या, ब्राह्मणभोजनं घाला, नैवेद्य करा, अनुष्ठान बसवा, पूजा बांधा. तात्पर्य

काय कीं, हें श्रीमंतीचं सोंग सांभाळायला पाण्यासारखा पैसा खर्च होतो पाण्यासारखा. इतकं महाग कुटुंब करून पुढें निभाव कसा लागावा ! छे, छे, छे !

**पद्य**–( लते खचित तूं प्रियकरणी. )

**नको विवाहचि हा मजला ॥ सोंग नको हें श्रीमंतीचें, कीर्ति नको सन्मानहि असला ॥ धृ० ॥ धूर्त तो भद्रेश्वर वेंची । द्रव्य किती । या नाहिं मिती । पाहोनि अती । जिव घाबरला ॥ १ ॥**

आतां दीक्षित आले म्हणजे असंच सांगणार. ( कांहीं विचार करून ) अरे पण भलत्याच आवेशांत विवाह नको म्हटलं खरं, पण विवाहच जर केला नाहीं, तर कुटुंब कसं मिळणार ? आम्हांला पुत्र कसा होणार ? तसंच दोन महिन्यांच्या आंत लग्न करून सहकुटुंब परत येतों, असं मिशांना पीळ देऊन, मी माझ्या पुतण्याला सांगितलं तें व्यर्थ होणार, त्याची वाट काय ? तेंहि असो, एक वेळ पत्करलं. परंतु आलों तसाच जर परत गेलों, तर गांवांत पोरांपासून थोरांपर्यंत सर्व म्हणायला लागतील कीं, मोठे लग्न करून घ्यायला गेले होते ! पण म्हाताऱ्याला मुलगी देतो कोण ? (**आरशांत पाहून**) तेच लोक जर आतां पाहतील तर मला म्हातारा म्हणण्याची त्यांची पुण्याई नाहीं. मी वेडा म्हणून भद्रेश्वरावर इतका रागावलों. (**मिशांवर पीळ देत देत हंसत हंसत**) शाबास आहे त्या भद्रेश्वर दीक्षिताची ? आम्हां-सारख्यांचीं लग्नं हवी ती युक्ति लढवून, त्यानंच जुळवून द्यावींत. या कामांत त्याचा हात धरणारा दुसरा मध्यस्थ मिळायचा नाहीं !

**पद्य**–( द्वैत करी ही विनाश अवघा )

**मध्यस्थाची असे कुशलता त्याच्या अंगीं पुरी ॥**
**स्वाहा केलें धन बहु माझें मजला फसवुनि जरी ॥ १ ॥**
**दंतपंक्ति ही नवी जडविली; युक्ति तयाची खरी ॥**
**सहज चावतां स्पष्ट बोलतां येतें तरुणापरी ॥ २ ॥**
**मिशा काजळी कशा दिसति या कलप चोळितां वरी ।**
**पाहूं आतां कशी येईना नवरी चालत घरीं ॥ ३ ॥**

शरीराची तयारीहि बरीच होत चालली आहे. ( **दंडावर बुक्क्या मारून** ) हे दंड पंधरा दिवसांपूर्वी अगदीं मऊ पिसपिशीत लागत होते, तेच आतां वरवंट्यासारखे घट्ट लागतात तशीच ही छातीसुद्धां किती रुंदावली ! या मांड्या तर शिसवीच्या खांबासारख्या झाल्या आहेत. आणि इतकं हें सारं झालंच पाहिजे. कारण दररोज खाद्य कसं चाललं आहे ! बैठकी मारायच्या, कोहाळेपाक बडवायचा, जोर-जोडी करायची, आटीव दूध झोकायचं. नमस्कार घालायचे, बदामाची खीर चापायची. हो खरंच वेळ झाली. शामसुंदर ! अरे शाम ! इकडे ये.

**शाम**—( **येत येत** ) काय आज्ञा आहे ?

**श्रीमंत**—असा तोंडांतल्या तोंडांत काय पुटपुटतोस ? मोठ्यानं नाहीं का बोलतां येत ?

**शाम**—चुकलों यजमान, काय हुकूम आहे ?

**श्रीमंत**—हुकूम कसला ? कूष्मांडपाक आणण्याची वेळ नाहीं का झाली ?

**शाम**—यजमानांनीं काल ताकीद केली होती कीं तो पाक पचत नाहीं म्हणून आणूं नकोस.

**श्रीमंत**—अरे नंदीबैला, पाक पचत नाहीं म्हणायला मी का म्हातारा आहे का रे ?

**शाम**—( **स्वगत** ) म्हातारा असून शिवाय मूर्ख आहेस !

**श्रीमंत**—कां रे ? आतां कां तोंड बंद झालं ! पाक पचत नाहीं असं म्हटलं होतं ?

**शाम**—( **आर्जवानें** ) मला तसं ऐकायला आलं सरकार.

**श्रीमंत**—तसं ऐकायला आलं ! जा, बहिरट कुठला, चार बड्या घेऊन ये; ( **शाम जाऊं लागतो.** ) पण आधीं ती रंगीत जोडी आण पाहूं. ( **जाऊं लागतो.** ) अरे शाम ! इकडे ये. खरंच सांग, मी म्हातारा दिसतों का रे ?

**शाम**--( **जवळ येऊन** ) भलतंच सरकार ! असाल तर दिसाल !

**श्रीमंत**—तर मग माझं वय किती असावं बरं ?

**शाम**—श्रीमंतांचं वय जवळ जवळ तिशीच्या पुढें आणि बत्तिशीच्या आंत; फारच झालं तर बत्तिशी पार पडली असेल !

**श्रीमंत**—इतकंच, इतकंच. बरं जा, जोडी आणि पाक आणून दे. (**शाम जातो.**) हा म्हणतो बत्तीस, मी म्हणतों चाळीस ! तरी कांहीं म्हातारा नव्हे, बत्तिशी पडली असं ऐकूं आलं, तेव्हां म्हटलं या शाम्याला आमचं वर्म कळलं ! पण नाहीं. चला आतां थोडा व्यायाम करूं. (**उठूं लागतो.**) ओय ! ओय ! ओय ! पण ही कमरेची कळ कधीं राहणार ? चोळून शेकतों, तेल चोळतों, तरी कमी होत नाहीं.--

(**कमरेवर बुक्क्या मारतो इतक्यांत भद्रेश्वर येतो त्यास**) कां दीक्षित, त्या अभ्रकाचं काय केलंत ?

**दीक्षित**--त्या अभ्रकाचं राहूं द्या. (**आजूबाजूस पाहून**) श्रीमंत आपल्याला कळवलंच होतं, त्याप्रमाणं कांचनभटांची मुलगी पाहून ठरवून आलों.

**श्रीमंत**—(**आनंदानें**) काय, पाहून ठरवून देखील आलांत ? कशी काय आहे सांगा पाहूं ?

**दीक्षित**— काय सांगूं श्रीमंत, अहाहा ! मुलगी पण मुलगी ! शुद्ध शुक्राची चांदणी चमकत होती. तेरावं सरून चौदावं लागून पांच सात महिने झाले आहेत.

**श्रीमंत**—(**आनंदानें**) काय म्हणतां ! ठरवा मुहूर्त. बरं गोरी आहेना ?

**दीक्षित**—गोरी नव्हे नुसती ! उजळा घातलेली बावनकशी सोन्याची पुतळी आहे ! फारच, अतिशयच मनोहर !

**श्रीमंत**—(**घाईनें चुटकी वाजवीत**) हं. चला तर, लागा तयारीला. उशीर नको, उठा, मुहूर्त ठरवून या.

**दीक्षित**—श्रीमंत, आतां इतक्यांत कांचनभटजी आपल्याला पाहण्याकरितां येतील. ते येऊन गेले म्हणजे काय तें ठरवूं.

**श्रीमंत**—मला पहायला येणार ? खुशाल येऊं द्यात !

**दीक्षित**—श्रीमंतांनीं अंतरमहालांत जाऊन बसावं. म्हणजे इथल्यापेक्षां

तिथं उजेड कमी आहे; आणि तितकं तें आपल्याला बरं. तसंच आपल्याला किंचित् कमी ऐकायला येतं हें त्यांना कळून उपयोगी नाहीं, म्हणून त्यांना कांहीं विचारूं नका. आणि त्यांनीं कांहीं विचारलं तर धोरणानं माझ्याकडे बोट करा. ते येऊन जाईतों भागवताची पोथी पहात बसा. मला जी बतावणी करावयाची ती मी करतों. बरं श्रीमंत, मग चला तर आंत जाऊन बसा. इतक्यांत येतील ते. मी बाहेर जाऊन बसतों. ( **जातो.** )

**श्रीमंत**—खुशाल येऊं देत, असं मी जोरानं सांगितलं खरं, पण इतक्यांतल्या इतक्यांत छाती धडधडायला लागली हें काय ?

( कामदा. )

**मी नसे जरी भ्याड जातिचा ॥ भास कां असा होत भीतिचा ? ॥**
**समयिं जो न भी पुरुष तो खरा ॥ उक्तिविषयिं या किंतु ये जरा ॥**

( जातो. )

---

## प्रवेश ४ था

### स्थळः—रस्ता

**कोदंड**—मला एक मोठा भ्रम होता, कीं या भुजंगनाथरूपी वृद्ध अस्वलाला आपली सुलगी देणारा चांडाळ या क्षेत्रांत, त्यांतून ब्राह्मणांत तरी कोणी निघणार नाहीं ! परंतु इथल्या एका कांचनभटानं तो माझा भ्रम दूर केला. वाहवारे कांचनभट ! अरे सात्त्विक जनकाचा अपत्यस्नेह कुणीकडे ! आणि लांडग्यासारखी ही तुझी स्वभावनिष्ठुरता कुणीकडे ! शिव ! शिव ! खरोखर—

पद्य–( करि दळो बारो कामिनी. )

**मज गमे ऐसा जनक तो ॥ मांग साचा ॥ ध्रृ० ॥**
**मुख सुरकुतलें, मस्तक पिकलें ॥ शरीर रोगांनीं पोखरिलें ॥**
**स्मशान ज्यानें सन्निध केलें ॥ त्या प्रेताला दुहिता विकितो ॥१॥**

क्रूराधम हा जनक कशाचा ॥ अप्रत्यभक्षी व्याघ्र मुखाचा ॥
वास नसावा जगीं अशाचा ॥ नवल हेंच यम यास विसरतो ॥२॥

वरं मुलींत कांहीं व्यंग आहे ? तेंही नाहीं. हा जितका दुर्गुणी, त्यापेक्षां ती शतपट सद्‌गुणी. हा जितका कुरूप, त्यापेक्षां ती सहस्रपट सुरूप ! अहा—

पद्य–( आनंद सागरम् )

बिंबाधरा, मधुरा विनयादिगुणीं मनोहरा मधुरा ॥ ध्रृ० ॥
ती सुंदरा ॥ विगुणा वरा ॥ घटिता विधि पी काय सुरा ॥ १ ॥

असो तिला आश्वासन दिल्याप्रमाणं आपलं कर्तव्य करावं. तर आतां—

: दिंडी :

भेटतों मी जावोनि भुजंगाला ॥ बोध करितों साधार कांहीं त्याला ॥ सुदैवानें वळल्यास कार्य झालें ॥ न तरि करणें तें पाहिजेच केलें ॥ १ ॥ (जातो)

---

स्थळः–दिवाणखाना.

**श्रीमंत**—कांचनभट आम्हांला पहायला आले होते, त्या प्रसंगीं भद्रेश्वर दीक्षित होते म्हणून वेळ निभावली; नाहीं तर आमची जरा धांदल उडाली असती. तो भट तर आमची श्रीमंती पाहून अगदीं गार होऊन गेला. आतां फक्त मुहूर्तनिश्चय व्हायचा अवकाश कीं, आम्ही पुन्हां सहकुटुंब झालों. मग काय ? अरे पण हां हां हां !

पद्य–( मन रमो सगुण गजवदन नामे. )

मन किती उताविळ घेत धांव ॥ कधिं वरिन नोवरी हीच हांव ॥ धृ०॥
स्त्रीसह केव्हां निघेल येथुनि ॥ केव्हां पुनरपि बघिन गांव ॥ १ ॥
दावुनि भार्या मम वैऱ्याला ॥ त्यावरी केव्हां करिन डाव ॥ २ ॥
पुत्रवंत होवोनि कधीं मी ॥ गाजवीन लोकांत नांव ॥ ३ ॥

**कोदंड**—( येऊन मानपूर्वक नमस्कार करतो. )

**श्रीमंत**—( **आनंदानें** ) या बसा. आमच्या लग्नाचं ठरलं; कळलंच असेल तुम्हांला ?

**कोदंड**—हो, कळलं श्रीमंत; आणि त्याचसंबंधानं—

**श्रीमंत**—ऐकून तर घ्या आधीं. दीक्षित म्हणतात, ठरलेली मुलगी अशी आहे, कीं प्रत्यक्ष अप्सराच !

**कोदंड**—( **हात जोडून** ) आणि म्हणूनच एक विनंति करायची आहे.

**श्रीमंत**—समजलों काय विनंति करणार ती. मुहूर्त ठरवून लग्नसमारंभ एकदां लौकर उरकून घ्या, हीच ना ? मग त्यांत विनंति कशाला ? मीच तुम्हांला सांगतों कीं, या कामांत श्रमाकडे पाहूं नका, खर्चाकडे पाहूं नका, होईल तितकी घाई करून एकदां शुभमंगल होऊं द्या. काय समजलांत ?

**कोदंड**--पण या विषयाचा आपण चांगला पोक्त विचार केला आहे का ?

**श्रीमंत**--अहो ! हें लग्न तर एकदां उरकून टाका; मग सावकाश विचार करूं.

**कोदंड**—आधीं क्रिया, आणि मग विचार ? छे ! छे ! आपण ही लग्नाची कल्पना सोडून द्या.

**श्रीमंत**—( **आश्चर्यानें** ) काय ? लग्नाची कल्पना सोडून द्या आणि धरा कसली ? ( **इतक्यांत दीक्षित व सुवर्णशास्त्री येतात.** ) काय चमत्कारिक आहां हो तुम्ही ! ऐकलंत का दीक्षित ! अहो शास्त्रीबुवा ! कोदंड सांगतात कीं, लग्नाची कल्पना सोडून द्या ! कशी आहे मसलत पुराणिकबुवांची !

**दीक्षित**—पुराणिकबुवाच ते ! त्यांना काय या विषयाचं ज्ञान ! “ भीष्मांनीं जे आहेत्ते दहा बाण सोडले, आणि द्रौपदी शोकाकुल होत्साती महा आक्रोश करती झाली बरं काय त्या कालाचे ठायीं जे आहेत्ते ! ” हें यांचं काम !

**सुवर्ण०**—यांत काय संदेह ! त्यांतून यांची स्मश्रु नुकती कुठें दृश्यमान व्हायला लागली आहे. अनुभव तो दूरच आहे !

**श्रीमंत**—मी त्यांना असंच उत्तर देणार होतों, इतक्यांत तुम्ही आलांत म्हणून थांबलों.

**सुवर्ण०**—कोदंड, शास्त्र प्रतिपादन करतं कीं, प्रसंगोपात्त असत्य भाषण करूनसुद्धां विवाह जुळवावा. आणि तुम्ही जुळलेल्यांत व्यत्यय आणतां! योग्य! स्तुत्य उद्योग!

**कोदंड**—( **स्वगत** ) हें दोषांचं त्रिकुट जमलं. आतां आपली मात्रा चालायचं कठिणच दिसतं. तथापि, दोन वळसे देऊन पाहूं. ( **उघड** ) श्रीमंत, मी आपल्याला हिताची गोष्ट सांगतों; ती न ऐकाल तर जगाच्या उपहासाला पात्र व्हाल!

**श्रीमंत**—जगाशीं आम्हांला काय करायचं आहे? आम्ही आमचे स्वतंत्र आहोंत. बस्स! आम्ही लग्न करणार!

**दीक्षित**—छान, छान! श्रीमंतांनीं अगदीं समर्पक उत्तर दिलं. का शास्त्रीबुवा?

**सुवर्ण०**—तें काय विचारावं! श्रीमंतांचं उत्तर म्हणजे गदाच ती! प्रहाराबरोबर चूर्ण व्हायचं. ( **हंसतात** )

**कोदंड**—वा! काय प्रशंसा चालली आहे! श्रीमंत, पुन्हां एकवार सांगतों कीं, यांच्या प्रशंसेला भुलून माझ्या शब्दाचा अव्हेर करूं नका!

**श्रीमंत**—फार भय घालतां हो! तर मग आम्ही लग्न करणारच!

**कोदंड**—श्रीमंत! प्रसंगीं शब्दांतला जोर आपल्या उपयोगी पडायचा नाहीं; म्हणून सांगतों, कीं तुमच्यासारख्यांनीं लग्न करण्याचा काय परिणाम होतो तो जगांत नीट डोळे उघडून पहा; आणि हा—

**पद्य**–( गजानना करना. )

**नका करूं अविचार ॥ भार्या नूतन वृद्धपणीं ती व्याधिच देते ताप अपार ॥ धृ० ॥ क्षीर सुधेसम ती क्षुधिताला ॥ परि न पचे त्या क्षुधा न ज्याला ॥ तरुणी सुखदा तरुणाला ॥ जरठा करी अपकार ॥ १ ॥ शक्ति नसोनी मुक्ता हातीं ॥ धरितां प्रबल हिराउनि नेती ॥ जरठ पतीची तीच गती ॥ घ्या मनीं यांतिल सार ॥ २ ॥**

**सुवर्ण०**—यजमान, आपण कांहीं वृद्ध नाहीं. तेव्हां यांचा निषेध आपल्याला तर लागू पडतच नाहीं. पण अहो कोदंड ! तरुणाप्रमाणं सशक्त असून जर एखाद्या वृद्धाला विधुरदशा प्राप्त झाली तर त्यानं द्वितीय, तृतीय नाहीं चतुर्थ संबंध सुद्धां कां करूं नये ?

**श्रीमंत**—हेंच विचारणार होतों मी. हो, वृद्ध असून निःशक्त असेल तो लग्नाच्या यातायातींत पडेल कशाला ? कां हो दीक्षित असंच ना ?

**दीक्षित**—अगदीं असंच ! आणि तरुण असून शक्ति नसेल, तो तरी कशाला पडेल !

**श्रीमंत**—बरोबर ! बरोबर बोललांत. कारण--

पद्य–( विधितनये पावगे. )

**बळ ज्याचें त्यास तें ।। मंथनविष जग जाळित सुटलें, विष्णु न घे, विधि तोहि न घे, शिव सहजीं पचवि तें ।। धृ० ।। वयोवृद्ध परि त्या शंभूनें ।। उगाचि कां, जी कुमारिका, वरिलें त्या गौरिते ।। १ ।। शक्ति तशी माझ्याही अंगीं म्हणुनि हवी स्त्री तरुण नवी ।। यांत चुके कोणतें ? ।। २ ।।**

**दीक्षित**—वाहवा ! वाहवा ! शास्त्रीबुवा, ऐकलंत श्रीमंतांचं भाषण किती पोक्त, किती साधार, किती जोराचं आणि किती स्पष्ट आहे ! या भाषणानं मंद मनुष्याचं सुद्धां समाधान झालं पाहिजे !

**कोदंड**--अहो दीक्षित ! अहो शास्त्रीबुवा ! केवळ कविकल्पनाधार जी देवादिकांची मानवी कृति तिचा गूढार्थ मनांत न घेतां ती आधारभूत धरून तदनुसार मनुष्यांनीं वागणं, म्हणजे केवढा मूर्खपणा, हें या श्रीमंतांना नको, परंतु तुम्हां दोघांना तरी कळलंच पाहिजे. कारण तुम्ही दीक्षित, आणि हे शास्त्रीबुवा ! अहो गोपिकांचा आधार घेऊन इतर स्त्रिया जर जारकर्म करूं म्हणतील, तर तें तुम्हांला मान्य होईल का ?

**सुवर्ण०**--( ओरडून ) जितं जितं ! दीक्षित, थांबा, मी देतों याचं उत्तर. अहो कोदंड, 'न स्त्री स्वातंत्र्यमर्हति' हें शास्त्रवचन आपल्या श्रवणपुटांत कधीं प्रविष्ट झालं आहे का ?

( श्रीमंत व दीक्षित आनंदानें 'वाहवा वाहवा' म्हणून टाळ्या वाजवितात. )

**कोदंड**--शास्त्रीबुवा, असा कोलाहल केल्यानं पक्षाचं मंडन होत नाहीं. तुम्ही सांगतां तें वचन माझ्या श्रवणपुटांतच नव्हे तर अंतःकरणपुटांत सुद्धां मीं सांठवून ठेवलं आहे. परंतु एक डोळा यमपुरीकडे आणि दुसरा स्मशानाकडे ठेवलेल्या थेरड्यानं तरुण कुमारीशीं विवाह लावावा, अशी शास्त्राची तरी स्पष्ट संमति आहे का ?

**सुवर्ण०**--नसेल, पण निषेध तर नाहींना ? यद्यपि असला तथापि शास्त्राद्रूढिर्बलीयसी.



**कोदंड**—म्हणजे स्त्रियांना तेवढे शास्त्राचे कडक निर्बंध आणि पुरुषांना मात्र पुरुषांनीं स्थापन केलेल्या शिथिल रूढी, हा कोणता न्याय ?

**दीक्षित**—हा पुरुषसत्तान्याय, असंच का म्हणाना ? होय कीं नाहीं शास्त्रीबुवा ?

**सुवर्ण०**—नाहीं; नाहीं दीक्षित. मी म्हणतों हा अन्नोदरन्याय. म्हणजे जावत्कालपर्यंत हें उदर आहे तावत्कालपर्यंत त्याला अन्न हें पाहिजेच.

**श्रीमंत**—त्याचप्रमाणं आम्हीं आहोंत तोंपर्यंत आम्हांला बायको ही पाहिजेच !

**सुवर्ण०**--अहाहा ! श्रीमंतांनीं अगदीं उत्तम रामबाण निर्णय केला. 'शुनः कपाले लगुडप्रहारः' याच न्यायाचा या कलिकालांत अवलंब केला पाहिजे. का कोदंड, मुख म्लान झालं ? शंकासमाधान होऊन प्रत्यय आला वाटतं ?

**कोदंड**--आला; परंतु तो कशाविषयीं ? तर वीतभर पोटाकरितां तुम्ही उभयतां कोणतंहि निंद्य कर्म करायला चुकणार नाहीं, याचा आला ! आतां मी जर तुम्हांला श्वानवृत्तीचे म्हणेन, तर त्यांतहि तुमचा गौरवच केल्यासारखा होईल. कारण त्याच्या ठिकाणीं प्रामाणिकपणा हा तरी एक मोठा गुण असतो; परंतु--

पद्य–( मम गौरीही कृपि कशिन मी. )

श्वानाहुनि अति नीच तुम्ही रे, स्वार्थी मांजरसे टपतां ॥
जंबुकगुरु जनवंचनकामीं ॥ साधुबकापरि वरि दिसतां ॥ १ ॥
वेदशास्त्रसंपन्न म्हणवितां ॥ केलि मुखोद्गत ती गीता ॥
तत्त्व तयांतिल कळे हेंच का ॥ सत्यपराङ्मुख कां होतां ॥ २ ॥
श्वान नाचतें पुच्छ घोळितें, चाटि अंग तुकड्याकरितां ॥
तसें नाचतां आर्जव करितां, रुचे समर्था तें वदतां ॥ ३ ॥
तो म्हणे अश्व वृषभाला ॥ तुम्हि मान तुकवितां त्याला ॥
तो म्हणे अहो रवि मेला ॥ लावितां पदर डोळ्यांला ॥
मी कसा तरुण रंगेला ॥ म्हणतांचि मदन अवतरला ॥
नरनंदी हे लक्ष्मीनंदन ॥ त्यांत भोंवतीं तुम्हि जमतां ॥
श्वान काक बक ढोंगी सोंगी ॥ दिवटी त्याच्या करिं देतां ॥ ४ ॥

**दीक्षित**––कोदंडा, मर्यादा सोडून चाललास ! शुद्धीवर ये ! कुणाला काय बोलतोस ? कृतघ्ना, विपत्काळीं तुला आश्रय दिला, त्याचे हे उपकार फेडतोस काय ?

**कोदंड**—तो आश्रय परोपकारबुद्धीनं दिला नाहींस. तूं रचलेल्या कपटनाटकांत माझा उपयोग होता, म्हणून दिलास !

**श्रीमंत**––( **सभय** ) हा विषारी साप आमच्यावर उलटल्यासारखा दिसतो ! याचे दांत पाडले पाहिजेत, नाहीं तर हा दंश करील, हो दंश करील !

**कोदंड**––अरे जा ! श्रीमंताचं सोंग घेणाऱ्या थेरड्या, ढोंग्या भुजंगनाथा, आतां एका क्षणांत तुझी श्रीमंती झाडून टाकतों पहा !

**श्रीमंत**––( **घाबरून** ) हा पहा, दीक्षित, हा पहा काय म्हणतो तें ! याला कांहीं तरी द्रव्याची लालुच दाखवा.

**दीक्षित**––( **बाजूस** ) श्रीमंत, आपण घाबरूं नका असे. काय करायचं त्याची योजना मीं पूर्वींच करून ठेवली आहे. ( **उघड** ) अहो कोदंड, झालं तें गेलं, आतां बोलूं नका. हवं तर श्रीमंतांच्या लग्नाबरोबरच तुमचं लग्न

करून टाकतों, हवी तर नवरत्नांची एक सुरेखशी कंठी गळ्यांत घालतों. बोला, कोणतं पसंत पडतं ?

**कोदंड**—चल, भाषण करूं नकोस ! तुला स्वतःसारखेच सर्व दिसतात ! माझं ऐकायचं असेल, तर लग्नाचा नाद सोडून, या नंदीबैलाला घेऊन, आतांच्या आतां या क्षेत्रांतून चालता हो. असं न करशील, तर तुझ्या कारस्थानाचा एका घटकेंत सर्व क्षेत्रभर डंका वाजला म्हणून समज !

**श्रीमंत**—( **बाजूस** ) दीक्षित होय म्हणा ! हें लग्न नको आणि ही भानगड नको. चला, आलों तसें मुकाट्यानं परत जाऊं. हवं तर मी बोलतों. अहो कोदंड, तुमच्या म्हणण्याप्रमाणं आम्ही निघून जातों आणि पुन्हां मेलों तरी लग्नाचं नांव काढणार नाहीं अशी शपथ घेतों.

**दीक्षित** – श्रीमंत हें काय ? तुम्ही स्वस्थ बसा. कोदंडा, या दीक्षिताला अजून तूं चांगला ओळखला नाहींस. तुझ्यासारख्या कच्च्या पोराच्या दटावणीला मी भीक घालतों काय ! तूंच हें क्षेत्र सोडून या क्षणीं चालता हो, नाहीं तर तुझ्यावर हवं तें कुभांड रचून तुला इथलं कारागृह दाखवीन.

**कोदंड**—दाखविशिल. कारण—

पद्य–( फिरवि वदन. )

**तूं पापी अधमाधम खलकषाय, निंद्य जगीं तुज काय ॥**
**मूर्तिमंत तूं अपाय, संग्रहघट कुमतीचा हा त्वदीय काय ॥ धृ० ॥**
**करुनि विविध पातकांस ॥ भोगिति जे नरकवास ॥**
**प्रमुख त्यांत व्हावयास ॥ कोण तुजशिवाय ॥ १ ॥**

**( जाऊं लागतो. )**

**दीक्षित**—अहो कोदंड थांबा ! ( **हात धरून** ) सर्पाला दुखवून जिवंत सोडीन, इतका मी भोळा नाहीं. या, या हेरंबमहालाच्या गारशा तळघराचं तर थोडं सुख घ्या. छे छे ! आतां ही धडपड—अरे गोरख, कानीफ ( **ते येतात** ) चला; या चोराला चतुर्भुज करून तळघरांत नेऊन टाका.

**( ते पुढें सरतात. )**

**कोदंड**—अरे तुम्ही मला बांधून नेणार तर न्या, परंतु आधीं या नीचाचा प्राण घेतों, मग न्या.

**दीक्षित**—बघतां काय ! ओढून घेऊन चला. ( **ओढूं लागतात.** )

**कोदंड**—( **जातांना** ) ध्यानांत ठेव. तुला या दुष्कर्माबद्दल झाडा देण्याचा प्रसंग लौकरच येईल ! ( **त्यास घेऊन जातात.** )

**दीक्षित**—बरं बरं ! पाहूं म्हणे ! बरं श्रीमंत मी या शास्त्रीबुवांना घेऊन इथले एक अधिकारी परिचयाचे झाले आहेत, त्यांना भेटून, याची काय व्यवस्था करावयाची तें ठरवून येतों.

**सुवर्ण०**—थोडा तरी सुवर्णप्रयोग करावा लागेल.

**दीक्षित**—पण मग अगदीं निर्धास्त.

**श्रीमंत**—ठीक आहे. कांहीं करा, पण याचं तोंड पुन: उघडणार नाहीं असं करा.

**दीक्षित**—तें माझं काम. चला शास्त्रीबुवा. ( **जातां जातां** ) प्रथमतः असं करूं, आणि असं नच जुळलं तर तसं करूं ( **जातात.** )

**श्रीमंत**—शाबास आहे आमच्या दीक्षितांची ! याला म्हणावं प्रसंगावधान. नाहीं तर आम्ही ! हें तुमचं कपट बाहेर फोडतों असं कोदंड म्हणाला मात्र, आणि इकडे माझ्या जिवाची काय त्रेधा झाली, ती फक्त मलाच ठाऊक, ईश्वराला सुद्धां कळली नसेल !

**: साकी :**

**भरे कांपरें, भ्रमे दृष्टि ही, जीभहि गेलि सुकोनी ॥**
**दीक्षितरायें लाज राखिली संकट तें टाळोनी ॥**
**आशा लग्नाची ॥ झाली प्रबळ पुन्हा अमुची ॥ १ ॥**

( **जातो** )

---

# अंक ३ रा

## प्रवेश १ ला

**स्थळ**—कुबेराचा वाडा.

**( मंदाकिनी, वल्लरी, तुंगा, त्रिवेणी, जान्हवी, शरयू वगैरे मुली गौरीची मांडणावळ मांडून. )**

**मंदाकिनी**—आतां बायकांना म्हणावं हवं तेव्हां या. आमच्याकडून तयारी आहे. वल्लरी, तें वाळ्याचं अत्तर गंधांत घातलंस ना ?

**वल्लरी**—हो हो. बघ हवं तर ! ( **वास दाखविते.** )

**शरयू**—मंदाकिनी पोरीसोरींना सरसकट एकेक तुरा द्यायचा म्हणतेस, पण तुरे सगळे इतकेच ना ?

**मंदाकिनी**—ते कां ? माळ्याला आणखी इतके आणायला सांगितले आहेत. बरं आतां मांडणावळींतलं कांहीं राहिलं नाहीं ना ? बघतें हो. अग सगळंच मुसळ केरांत ! गौरीपुढें मिठाईचं तबक ठेवायला विसरलोंच. शरयू, जा बरं तेवढं घेऊन ये. ( **शरयू जाते** ) आजचं हळदीकुंकू मुलीमुलींचं आहे. कांहीं चुकलं नाहीं म्हणजे झालं.

**जान्हवी**—कांहीं चुकत नाहीं. जिनं तिनं आपापलं काम संभाळायचं.

**मंदाकिनी**—( **बुवाचें सोंग घेतलेले दोन मुलगे हंसत येतात, त्यांस** ) या बुवा ! ही तुमची जागा बरं का ! बायका यायला लागल्या, म्हणजे डोळे मिटून माळ ओढीत पुटपुटत बसायचं. नाहीं तर त्यांच्या देखत जवळच्या ताटांतलं कांहीं तरी उचलून टाकाल तोंडांत.

**त्रिवेणी**—आम्ही सगळ्याजणी कशा हौसेनं जमून काम करतों आहों; पण ती शारदा कांहीं अजून आली नाहीं. मग कसला तिला इतका डौल आला आहे कोण जाणे !

**वल्लरी**—येऊं द्या तर खरी, चांगली खोड काढतें. आज मला तिची एक गम्मत समजली आहे.

**तुंगा**—अन गप्प, तीच आली पाहा.

**मंदाकिनी**—शारदे, हें ग काय तें !

**शारदा**—( येऊन ) अशी रागाऊं नकोस. झाला खरा बाई थोडा उशीर.

**मंदाकिनी**—मी तुला जेवताक्षणींच यायला सांगितलं आणि तूं आतां आलीस ? मोठी शहाणीच म्हणायची मग ? आणि म्हणते रागाऊं नको.

**वल्लरी**—मंदाकिनी, अग तुग करून कुणाचं ग शहाणपण काढलंस तें ? शुद्धीवर आहेस का ! कांहीं तरी मेला विचार ! आपली उचलली जीभ लावली टाळ्याला म्हणजे काय ! जिनं तिनं आपली पायरी ओळखून बोलावं.

**मंदा०**—हें काय ! मी पायरी विसरून कुणाला काय बोललें बाई ? आतां शारदेला उशीर कां केलास म्हटलं, त्यांत कांहीं चुकलं असेल तर सांग.

**वल्लरी**—आधीं कान पिळून जिभेला चांगला चिमटा घे, आणि नाकदुराई काढून चुकलें म्हणून बाईसाहेबांचे पाय धर.

**मुली**—( साश्चर्य ) बाईसाहेब कोण ?

**वल्लरी**—दिसत नाहींत का कोण त्या ! त्रिवेणी जा आधीं बाई-साहेबांना बसायला, तो कमळाचा मखमाली गालिचा घेऊन ये आणि शरयू—

पद्य-( लेगवोचिर वनमाली. )

**घेउनि ये पंखा वाळ्याचा जा जा जा झणी ॥ ध्रृ० ॥**
**नाजुक ही राणी घाबरि होय उन्हानें, उमटेना बघ वाणी ॥**
**मधुर सुवासाचें सुंदर झारि भरोनी, आण गडे तूं पाणी ॥ १ ॥**

**मंदाकिनी**—कुणाचे ? शारदेचे का हे आदरसत्कार चालले आहेत ? भली चावट बरं का तूं ! इतकं करून हंसते का बघा !

**शारदा**—काय मेला एवढासा उशीर झाला यायला, तर इतकी थट्टा करतेस ? येऊन जाऊन काय तो कामाचाच डौल ना ? तूं बैस कशी आतां स्वस्थ. मी तुझ्याहि वांटणीचं काम करतें आणि माझ्याहि वांटणीचं करतें.

**वल्लरी**—भलतंच कांहीं तरी ! बाईसाहेबांनीं काम करून आम्ही स्वस्थ बसायचं ! नको ग बाई !

**मंदा०**—वल्लरी, पुरे मेली इतकी थट्टा. मघाशीं मला एक शारदेची गम्मत समजली आहे म्हणत होतीस, ती काय गम्मत ग ?

**मुली**—खरंच वल्लरी, काय गम्मत ग ती ? सांग सांग, पाहूं लौकर ! **( तिच्याभोंवतीं जमतात. )**

**वल्लरी**—अशी घाई नका करूं गडे ! गम्मत म्हणजे गमतीगमतीनंच सांगितली पाहिजे. शारदा आज शेलारी नेसली आहे ती पाहिलीत का ?

**शारदा**—हं, आतां शेलारीवर वळली वाटतं संक्रान्त !

**वल्लरी**—कुणीं दिलीन् तें ओळखा बरं ?

**जान्हवी**—हा मेल्यांनो ! हें कसं ओळखायचं ! शारदे, तूंच सांगेनास ?

**शारदा**—वल्लरीचा एकदां चावटपणा संपूं द्या; मग सांगेन मी.

**वल्लरी**—श्रीमंतांनीं तुला शेलारी दिली; त्यांत मी ग काय चावटपणा केला ? श्रीमंतांनीं केला असं म्हणं हवं तर !

**तुंगा**—हें बाई कांहीं निराळंच दिसतं बरं का ? शारदे, श्रीमंत ग कोण ?

**शारदा**—मला कांहीं ऐकायलाच येत नाहीं.

**वल्लरी**—नाहींच यायचं ! पण तिला कशाला विचारतां ? मी सांगतें तें. ते हेरंबमहालांत येऊन राहिले आहेत ते—

**मंदा०**—समजलें; पण त्यांनीं काय म्हणून हिला शेलारी दिली ?

**वल्लरी**—उगीच कोण कुणाला देईल ? ही त्यांच्या मनांत भरली असेल, म्हणून दिली असेल. म्हणजे काय ? इतकं नाहीं का मेलं समजत ? अग ही शारदा येत्या वैशाखांत त्या श्रीमंतांची अर्धांगी होणार ! आतां तरी

पडला का उजेड ! खरंच का म्हणजे ! मुहूर्त सुद्धां ठरला. माझे बाबाच सांगत होते.

तुंगा—सुवर्णशास्त्री ना ! मग खरंच तर. तरी म्हटलं, वल्लरीनं इतकी थट्टा केली तरी ही रुसली कशी नाहीं !

शरयू—तूं तरी मोठी हीच दिसतेस. अग अशा साखरथट्टेला का कुणी रुसतं ? उलटी गालांतल्या गालांत खुदुखुदु हंसत होती.

जान्हवी—कां नाहीं हंसायची ? एकदां लग्न होऊं द्या म्हणजे बघा—

पद्य–( जरि गंध गजाचा. )

**श्रीमंत पतीची राणी, मग थाट काय तो पुसतां ॥**
**बंगला नवा नवकोनी, फुलबाग बगीचा भवता ॥**
**किती दासी जोडुनि पाणी, "जी" म्हणतिल कामाकरितां ॥**
**ही जात्या चतुर शहाणी, पति मुठींत ठेविल पुरता ॥ चाल ॥**
**सुग्रास बसुनि खायाला ॥ मउ शय्या लोळायाला ॥**
**गुजगोष्टी काळ जायाला ॥ ना काम धाम, ना चिंता ॥**
**ही फुगेल बघतां बघतां ॥ १ ॥**

मंदाकिनी—बरं काय ग शारदे, श्रीमंतांची खाशी स्वारीच का पाहायला आली होती ?

शारदा—इश्श मेलं ! मला नाहीं ठाऊक बाई ?

जान्हवी—अहाहा ! इतक्यांतच का इतकी लाजायला लागलीस ! मग लग्न झाल्यावर तर लाजून लाजून मानेचे तुकडे पडतील. त्यांच्या जवळच का बसली होतीस ?

वल्लरी—का श्रीमंतांच्या मांडीवर बसली होतीस ?

शरयू—इश्श ! लग्नाच्या आधींच का मांडीवर बसतात कुणी ?

वल्लरी—अग आम्ही काय भिक्षुकांच्या सुना. श्रीमंतांच्या घरची काय रीत असते ती आम्हांला काय माहीत !

**शारदा**—मंदाकिनी, या बाई फारच चावटपणा करायला लागल्या. मला कांहीं काम सांगतेस, का मी आपली हळदकुंकूं घेऊन जाऊं घराकडे ?

**मंदाकिनी**—आतां नका ग कुणी तिची थट्टा करूं.

**जान्हवी**--पण शारदे, खरंच सांगूं का ? एकदां त्या वैभवांत जाऊन पडलीस म्हणजे--

पद्य– ( मूढमते तूं पाप )

**तूं श्रीमंतीण खरी शोभशिल ॥ डौल किती येईल तुला, मग आम्हां विसरशील ॥ धृ० ॥ कधीं पालखित मिरवित जाशिल ॥ कधिं अंबारी, मेणा कधिं, कधिं रथांत फिरशिल ॥ १ ॥ कधीं पैठणी लाल नेसशिल ॥ कधीं काजळी शालु बुट्ट्याचा अशी चमकशिल ॥ २ ॥ कधि मोत्यांची पुतळी होशिल ॥ शुभ्र हिरा कधिं, पाचहि हिरवीगार लेशिल ॥ ३ ॥**

**मंदाकिनी** —डौल करूं द्या, आम्हांला विसरूं द्या. पण एकदां श्रीमंतांची पट्टराणी होऊं द्या ! बिचारी किती दिवस नवऱ्यासाठीं नवस करीत होती; पण शेवटीं देवानं गाऱ्हाणं ऐकलं हो ! शारदे, असं स्थळ हजारों रुपये हुंडा भरून मोठमोठ्यांच्या मुलींना सुद्धां मिळायचं नाहीं.

**त्रिवेणी**--बरं पण वल्लरी श्रीमंतांचं वय किती आहे ?

**वल्लरी**--अंहं ! तेवढं मात्र विचारूं नकोस. श्रीमंत आहे, हौशी आहे, मायाळू आहे, तें सगळं हवं तसं आहे, पण वयाची गोष्ट काढूं नकोस.

**मुली**---म्हणजे ? म्हातारा आहे कीं काय ?

**वल्लरी**--छे छे !

पद्य – ( शांति धरा नृपराज )

**म्हातारा इतका न ॥ अवघें पाऊणशें वयमान ॥ लग्ना अजुनि लहान ॥ धृ० ॥ दंताजीचें ठाणें उठलें, फुटले दोन्ही कान ॥ डोळे रुसले कांहिं न बघती ॥ नन्ना म्हणते मान ॥ १ ॥ तुरळक कोठें**

**केस रुपेरी, डोइस टक्कल छान ।। भार वयाचा वाहुनि वाहुनि कंबर होय कमान ।। २ ।। काठीवांचुनि नेट न पाया परि मोठें अवसान ।। उसनी घेउनि ऐट चालतां काय दिसे तें ध्यान ।। ३ ।।**

**जान्हवी**--शारदे, ऐकलंस का पतिराजांचं वर्णन ? अशी खालीं कां मान घातलीस ? लाजलीस वाटतं ?

**मंदाकिनी**--( **मुलींना** ) पुरेग आतां चावटपणा. शारदे, खरंच सांगतें. तुझ्यासारखा तरण्या बायकोला म्हातारा नवरा मिळाला तर वाईट नव्हे. कां म्हणून नाहीं विचारलंस ? तुंगे, तें गाणं म्हणं ग.

**तुंगा**—

पद्य – ( परदेसन जोगनी )

**जरठास तरुण हो स्त्री जरी ।। ती नवरा तो स्त्रीपरी ।। ध्रृ० ।। भय फार बाळगी तो तिचें ।। जणुं मांजर ताटाखालचें ।। त्यां व्यंग ठाउकें अंगिंचें ।। मन धरुनि तिचें बहुपरी, राखि तो लौकिक घरच्या घरीं ।। १ ।।**

**मुली**—( **एकेक वाक्य म्हणतात** ) अग तुला तो मुलीसारखी जतन करील. अगदीं तळहाताच्या फोडासारखी संभाळील. तुझे शब्द म्हणजे कसे अगदीं फुलासारखे झेलील. तोंडांतून निघायची फुरसत, कीं तुझी असेल ती हौस पुरवील. तो तुला अगदीं ताइताप्रमाणं गळ्यांत बाळगील !

**वल्लरी**--तुमचं ठीक आहे ग. दुसऱ्याचा इकडे प्राण जात असला, तरी तुमची आपली थट्टा चालायची ! ( **शारदेजवळ जाऊन** ) फार चावट बाई या मुली नाहीं ?

**शारदा**—( **तिला ढकलून** ) आणि तूं काय कमी आहेस !

**जान्हवी**—( **टाळी वाजवीत** ) एका दुतोंड्या माणसाची खाशी मोडली, नाहीं ग मंदाकिनी ?

**मंदाकिनी**--तें जाऊं द्या मेलं ! पण कांचनभट किती कवडीचुंबक असला तरी तसल्या म्हाताऱ्या खोडाच्या पदरांत आपला पोटचा गोळा टाकील, हें मला अजून खरं वाटत नाहीं.

~~शरयू~~—आणि शारदेला तरी कुठें खरं वाटत होतं ! त्या दिवशीं त्या संगमनाथाच्या देवळांत ही म्हणाली नाहीं का कीं, माझे बाबा कांहीं अशा उलट्या काळजाचे नाहींत, पण बाई, कायसं म्हणताततना ! ' दाखिवलं सोनं आणि हंसे मूल तान्हं. ' मग हा तर कांचनभट !

**त्रिवेणी**—शारदे, हें ग काय ! अशी रडूं नकोस बाई; आईबापांनीं बुडविलं आणि नवऱ्यानं तुडिवलं, सांगायचं कुणाला ? अशीच आईकडे जा, आणि तिच्याकडून बघ कांहीं झालं तर. पण बाहेर हांका कोण मारीत आहे ? ( **पडद्यांत** ) अव त्या कांचनभटाच्या सारदाबाई हत हैत न्हव का ? सारदाबाई, अव सारदाबाई !

**वल्लरी**—शारदे, तुलाच कोणी हांक मारीत आहे. आहेत रे—

**शारदा**—कोण आहे रे ?

**गाडीवान**—~~( पुढें येऊन )~~ कांचनभट तुमासनी दाखवायला शिरिमंताकडे घेऊन जानार हैत, म्हून म्यां गाडी आनलीया. त्ये आतां इकत्यांत यत्याल. तुमी गाडीमंदी येऊनशेनी बसा.

**शारदा**—बरं आलें ~~चल~~. ( **तो जातो.** ) मंदाकिनी, येतें बरका. ( **~~सर्व मुली तिच्या कानाशीं कुजबुजतात.~~ मंदाकिनी तिला हळदकुंकू घेऊन जा म्हणून सांगते.** ) काल तर ते दोघे येऊन पाहून गेले, आज आणखी काय हें ! मघांपासून त्या सुदाम सावकाराच्या लग्नाची आठवण होते, आतां वल्लरीनं सांगितलंन तेंच जर खरं असेल तर माझं काय होईल बाई ! आणि ती तरी खोटं काय म्हणून सांगेल ! ऐकलंन् तें सांगितलंन् !

पद्य-( बात हारकीजे जबानसे )

**मूर्तिमंत भीति उभी मजसमोर राहिली ॥ वाटतें दुजा सुदाम मज दिसेल त्या स्थळीं ॥ दाखवावयास मला तात नेत त्याकडे ॥ राक्षसा रुचेल का पहावया जसा बळी ॥ १ ॥**

( जाते. )

---

## प्रवेश २ रा

**स्थळः**—हेरंबमहाल.

**श्रीमंत**— लग्नाला मुहूर्त कशाला पाहतात कोण जाणे. तो मुहूर्त येई-पर्यंत आमचा दम कसा निघावा ! त्यांतून काल तें स्वप्न पडल्यापासून तर आमची फारच धांदल उडाली आहे. पहावं तिकडे कोदंड दिसतो. काय चमत्कारिक स्वप्न तें !—

**पद्य**–( जीस कपट ठाउकें नसें )

**लग्न होय चार दिवस, नाच रंग पाहिले ॥ काढिली रथीं वरात, तीस जवळ घेतलें ॥ राजदूत ते अशांत चोहिंकडूनि धांवले ॥ बांधुनी मला रथीं, तसेच नीट चालले ॥ १ ॥**

इतक्यांत कोदंड पुढें तोंड करून हंसत हंसत मला म्हणाला, कीं चला आतां कारागृहांत ! शृंखला-नवरी तुमची वाट पहात आहे ! हे शब्द ऐकतांच माझं देहभान गेलं. जागा होऊन पाहतों तों दीक्षित पुढें उभे. त्यांना स्वप्नाची कथा सांगितली. कोदंडाची भीति समूळ नाहींशी करण्याची कांहीं तोड काढतों, असं त्यांच्यापासून वचन घेतलं, तेव्हां थोडासा निर्धास्त झालों. बरं, कांचनभट आज आपली मुलगी मला दाखविण्या-करितां आणणार होता, तो कां अजून आला नाहीं ? तो नाहीं आला तर न येईना, पण ती आली पाहिजे. या महालांत येऊन ती आज मला भेटणार, या कल्पनेनंच माझ्या सर्वांगावर आनंदाच्या लहरी येताहेत.

**पद्य**-( चार जातकी. )

**येइल माझी भावी कांता आतां ती या एकांतीं ॥ वेडे होतिल दिपतिल डोळे पाहुनि ती कांती ॥ १ ॥ हंसविन, रुसविन, लाज-वीनही प्रश्न खुबीचे बहु करुनि ॥ उभी राहिली बसविन खालीं, कोमल कर धरुनि ॥ २ ॥ पाहिल चोरुनि मुख वळवोनि जेव्हां रमणी ती मजला ॥ ही मौजेची छबी आमुची पाडिल मोह तिला ॥ ३ ॥**

**( आरशांत पाहून )** अरे ! नुकता स्नानापूर्वी कलप लावला, आणि हे मिशांचे बुडखे इतक्यांत पांढरे दिसायला लागले कीं काय ? नाहीं; उगीच वाटलं तें. एकदां लावला म्हणजे पुन्हां पांढरा केस म्हणून आंतूनच निघायचा नाहीं, असा जर मला कोणीं कलप देईल, तर मी त्याला केसागणिक रुपये मोजीन. पुरुषाचं तेज, सत्त्व या पांढऱ्या केसाच्या रूपानं बाहेर निघून जातं असं सांगतात, म्हणून यांची इतकी प्रतिष्ठा ! **( जिन्याकडे पाहून )** आली वाटतं ! **( गडबडीनें )** दीक्षितांनीं सांगितलेल्या तयारींत चुकलों नाहींना ? पाहूं एकदां—

: दिंडी :

**करीं झळके आंगठी ही हिऱ्याची ॥ गळां कंठी लोळते मौक्तिकांची ॥ कर्णि बाळी आहेच कडें हातीं ॥ उंच वसनें घेतलीं योग्य तीं तीं ॥**

**( आरशांत पाहून )** मघांच्या विचारांनीं मुद्रा जरा निस्तेज दिसते. ती उठावदार दिसायला एक दोन अर्ध्यें तें प्रसन्नतीर्थ घ्यावं. पण अवकाश कुठं आहे ? आलीच ती.

**दीक्षित—( गडबडीनें येऊन )** श्रीमंत, आपण जाऊन आंतल्या महालांत बसा. कांचनभट इतक्यांत मुलगी घेऊन येईल. वेळ मात्र चांगली मारून नेली पाहिजे, नाहीं तर भ्रमाचा भोपळा फोडाल !

**श्रीमंत**—छे ! ती भीति नको; पण तुम्ही आतां वरचेवर तुमचं तोंड दाखवूं नका; फक्त तिची आणि माझी गांठ घाला लौकर.

**दीक्षित**—आपण चला तर आंत, मी इथेंच उभा राहातों. **( श्रीमंत जातात. )** या भुजंगनाथानं श्रीमंतांचं नुसतं सोंग घेतलं आहे, तर याचा स्वभाव इतका लहरी झाला आहे. म्हणतो ‘ फक्त तिची आणि माझी गांठ घाला. ’ हें साधायला काय युक्ति काढावी ? आहा ! ही आमच्याजवळ युक्तीची जंत्री असल्यावर काय कमी ? **( कांचनभट येतो त्यास पाहून )** या तुम्ही कांचनभटजी ! किती विलंब केलांत, बरं मुलगी कुठें आहे ?

**कांचन०**—खालीं सुवर्णशास्त्र्यांच्या कुटुंबांनीं थोडी बसवून घेतली आहे. श्रीमंतांची मर्जी सुप्रसन्न आहेना ?

**दीक्षित**—अहो ! नसते कधीं ? पण हो. बरं स्मरण झालं. आज मुलगी दाखवायला आणलीत, उत्तम केलंत. कां तें सांगतों, अहो, मुलगी अतोनात भित्री आहे, असा कोणी श्रीमंतांचा ग्रह करून ठेवला आहे.

**कांचन०**—माझी शारदा भित्री ! हें पाहा दीक्षित, नसती खोड काढून व्यापार मोडणं,—नव्हे लग्न मोडणं, हें श्रीमंतीलाहि शोभत नाहीं आणि संभावितपणालाहि उचित नाहीं. शारदेला भित्री कोण म्हणतो तो ? आणा त्याला असा.

**दीक्षित**—अहो विघ्नसंतोषी लोकांना उद्योग काय दुसरा ? तुम्हांला त्यांच्याशीं काय कर्तव्य ? प्रत्यक्ष मी तुमची मुलगी पाहिली आहेना ? पण श्रीमंतांच्या मनांत भरलेला संशय तर तसाच ठेवून सोय नाहीं ! त्यांचं म्हणणं श्रीमंतांच्या बायकांत भित्रेपणा असणं, हा मोठ्यांतला मोठा दुर्गुण.

**कांचन०**—आणि तुमच्या आमच्या बायकांत त्याला गुण का मानतात ? तें कांहीं नाहीं. मीच आतां श्रीमंतांना सांगतों कीं, स्त्री करायची, म्हणजे जन्माची जोड पहायची. ती प्रथमतःच नीट कसोशीनं पारखून केलेली चांगली.

**दीक्षित**—झालं ! आणखी काय ? आणि मी तरी रीतीविरुद्ध मुलीला इकडे दाखवायला घेऊन या, म्हणून तुम्हांला सांगितलं, तें याचकरतां. प्रथम काय तें होऊं द्या. जा, मुलीला हांक मारा. तिला आंत नेऊन त्यांच्या समोर बसवूं, आणि आपण बाहेर निघून येऊं. श्रीमंतांच्या प्रश्नाला उत्तर द्यायला तुमची मुलगी खंबीर आहे.

**कांचन०**—हो हो ! आहे म्हणजे ! जातों तर, तिला घेऊन येतों ( **जातो** )

**दीक्षित**—मुलीचं लग्न करणं, म्हणजे एक फायद्याचा व्यापार करणं, हें तत्त्व या भटाच्याच डोक्यांत खरं उतरलेलं मीं पाहिलं. ( **कांचनभट मुलगी घेऊन येतो.** ) अहो भटजी, थांबा. मी आलों रस्ता दाखवायला.

( **सर्व जातात.** )

---

## प्रवेश ३ रा

**( श्रीमंत बसले आहेत. कांचनभट मुलीस घेऊन येतो. दीक्षित बरोबर येतो. )**

**कांचन०**—( **नमस्कार करून** ) मुली ये अशी, इथें उभी राहा. श्रीमंत ही भित्री आहे, असं आपल्याला कुणीं सांगितलं ?

**श्रीमंत**—हे दीक्षित, आणि हे तुम्ही ! काय तें पाहून घ्या.

**कांचन०**—वाहवा ! दीक्षित, आपलाच का उद्योग हा ! मग काय बोलायचं !

**दीक्षित**—श्रीमंतांचा उद्देश तुम्हांला समजला नाहीं भटजी ! चला बाहेर, सर्व सांगतों. ( **स्वगत** ) श्रीमंतांनीं आमच्याकडे बोट दाखवून आमच्या मंत्राचा आमच्यावरच प्रयोग केला. ( **उघड** ) भटजी चला.

**श्रीमंत**—दीक्षित, चाललांत कुठं ? थांबा. तुम्ही आमचा मोठा अपराध केलांत. हिचं वर्णन करतांना, तुम्ही हिचं अर्धअधिक सौंदर्य चोरून ठेवलंत तें ठेवलंत; शिवाय तिच्या नाजुकपणाची गोष्टसुद्धां सांगितली नाहींत. किती नाजुकपणा हा ! संध्याकाळच्या कोंवळ्या उन्हानंसुद्धां हिच्या मुखकमलाच्या पाकळ्या कशा तांबड्या होऊन गेल्या आहेत पाहा. हंसतां काय !

**दीक्षित**—( **हात जोडून** ) महाराजांनीं क्षमा करावी. ( **भटजीस** ) पहा किती दयाळू अंतःकरण !

**कांचन०**—हें काय विचारावं ! मुली, पाहिलीस का आतांपासूनच तुझी किती काळजी ती ! तूं भित्री आहेस असा यांचा समज आहे, तेवढा नाहींसा कर. माझं यांच्याशीं थोडं काम आहे.

**श्रीमंत**—दीक्षित, आमच्या कुटुंबाकडे पाहिजे तशी दृष्टि लावणारे तुम्ही कोण ? चला इथून.

**दीक्षित**—चुकलों महाराज. ( **स्वगत** ) इतक्यांतच मत्सराचा संचार झाला का ? ( **उघड** ) चला भटजी.

**शारदा**—तुम्ही चाललांत; पण बाबा, मी इथें एकटी कशी राहूं ?

**कांचन०**—( **हळूच** ) हाच हाच तो भित्रेपणा. पुन्हां असं बोलूं नकोस. मी हा आलोंच. काय नांव गांव विचारतील, तें न भितां सांग म्हणजे झालं. ते कांहीं खात नाहींत तुला ! ( **जातो.** )

**शारदा**—( **स्वगत** ) बापाला माया कमी म्हणतात तें खरं !

**श्रीमंत**—( **स्वगत** ) आतां सुरुवात कशी करावी ? मीच गांगरून गेल्यासारखा झालों आहें. ( **उघड** ) तूं अशी उभी कां ? या सुखासनावर बैस. भिऊं नकोस. तुझंच घर आहे.

**शारदा**—( **स्वगत** ) मला भिऊं नको म्हणतात; आणि यांच्या अंगांत कांपरं भरलं आहे हें कसलं ? म्हातारपणाचं कीं काय ?

**श्रीमंत**—तुझा आमचा थोडक्यांतच एकजीव व्हावयाचा आहे, म्हणून आतांपासून थोडी थोडी लाज कमी कर. ( **जवळ जाऊन** ) हंसत हंसत माझ्याकडे पाहा बरं.

**शारदा**—( **वर पाहून स्वगत** ) अग बाई ! काय चमत्कारिक चेहरा दिसतो हा ! इश्श ! कपाळभर सारं आठ्यांचंच जाळं पसरलं आहे.

**श्रीमंत**—( **स्वगत** ) माझ्याकडे पाहून हिनं तोंड फिरवलंन तेव्हां कलपाची शंका आली कीं काय हिला ! ( **आरशांत पाहतो.** )

**शारदा**—( **स्वगत** ) आरशांत काय पाहतो हा ?

**श्रीमंत**—( **स्वगत** ) मला वाटलं, एखादा पांढरा केस डोकावून पाहूं लागला कीं काय ? पण नाहीं. ह्या हिरड्या मात्र नवीन सुजल्या. मला मोठं भय वाटतं या दांतांच्या कवळीचं. आज बसावी तशी साफ बसली नाहीं. पण हें काय ! याच नादांत लागलों. ( **तिच्याजवळ जाऊन उघड** ) अजून नाहीं का बसलीस तूं ? बरं तुझं नांव काय तें न लाजतां मोठ्यानं सांग. अगदीं भिऊं नकोस.

**शारदा**—माझं नांव शारदा.

**श्रीमंत**—काय सारजा ? वा ! नांव किती गोड ! सुंदर मुखांतून, मधुर वाणींतून निघालेलं गोड नांव ! मग काय विचारतां ! ( **मान डोलवीत राहतो.** )

**शारदा**—(**स्वगत**) मीं सांगितलं शारदा, आणि यांनीं ऐकलं सारजा! वल्लरीनं म्हटलं तें खरं. याला चांगलं ऐकायला येत नाहीं.

**श्रीमंत**—(**जवळ जाऊन**) बरं आतां वर पाहा, आणि मी तुला आवडलों असं हास्यमुखानं सुचीव बरं.

**शारदा**—(**स्वगत**) हें लक्षण कांहीं ठीक दिसत नाहीं.

**श्रीमंत**—तूं कां नाहीं वर पहात मी समजलों, पण श्रीमंतांच्या बायकांना इतकी लाज नको. (**तिचा हात धरून**) तुझ्या मनांत भरलोंना मी?

**शारदा**—(**दूर होऊन**) हं, हें काय! पहायला आणलेल्या मुलीच्या अंगाला हात लावणं म्हणजे काय?

**श्रीमंत**—(**हंसत**) आतां कशी मोठ्यानं बोललीस! पण हेंच हंसत बोल, रागानं नको. हात धरणार होतों, त्यांत काय बिघडत होतं बरं? लग्न झाल्यावर तरी तो मीच धरणार कीं नाहीं?

**शारदा**—माझ्या फुटक्या नशीबानं तसं झालं, तर आहेच कपाळीं. पण तोंपर्यंत कुंवारपणाला न शोभणारं, असं मी कुणाला कांहीं करूं द्यायची नाहीं!

**श्रीमंत**—बरं लग्न झाल्यावर तुझ्या अंगावर दागिने घालायचे ते कसले पाहिजेत? हिऱ्याचे? का मोत्याचे? का पाचूचे? (**पाठीवर हात फिरवून**) जी हौस असेल ती सांग.

**शारदा**—(**हात झिटकारून**) हें पहा, असा जर चावटपणा पुन्हां कराल, तर मी मोठ्यानं ओरडून बाबांना हाक मारीन. पाहिलंतना मला? जातें मी आतां.

**श्रीमंत**—छे छे! नको नको नको! (**स्वगत**) बापाला कांहीं तरी भलतंच सांगेल. (**उघड**) छे छे! हें काय बरं सारजे! तूं जाऊं नकोस, (**तिला अडवितो.**) मीं तो विनोद केला.

**शारदा**—(**त्वेषानें**) मला अशी अडवाल, तर मी तुमच्या पायाशीं कपाळ फोडून घेईन. सोडा मला. कोण आहे हो तिकडे?

**श्रीमंत**—नको नको, तुझ्या पाया पडतों. ओरडूं नकोस. पुन्हां तसं करायचा नाहीं. खोटं वाटत असेल तर ही पहा थोबाडीत मारून घेतों. **( तसें करतो, दांतांची कवळी अर्धी बाहेर पडते. गोंधळून जातो. )**

**शारदा**—**( स्वगत )** अगबाई ! हें काय ! ही दांतांची बसविलेली कवळी गालफडांत मारून घेतांना बाहेर आली वाटतं.

**श्रीमंत**—**( स्वगत )** पाहिलीन ! पाहिलीन ! हिनं पाहिलीन ! आतां हिला काय सांगावं ! **( तिच्याजवळ येऊन उघड )** आमच्या राजवैद्यानं मला एक रसायन दिलं होतं, त्यानं माझे दांत किडले, म्हणून मी ते काढून हे नवे बसविले होते. हें मी तुला लग्न झाल्यावर सांगणारच होतों, तें आजच आपोआप कळलं, छान झालं. कारण नवराबायकोंत कांहीं गुप्त राहूं नये. खरं कीं नाहीं सांग ? पण ही गोष्ट कोणापाशीं बोलूं नकोस. नाहींना बोलायचीस ?

**शारदा**—माझी एक विनंति मान्य कराल, तर नाहीं बोलायची.

**श्रीमंत**—ती कोणती विनंति ?

**शारदा**—हीच कीं आपण आपल्या तोलाच्या कोणा तरी श्रीमंताच्या मुलीशीं लग्न करावं.

**श्रीमंत**—आणि तुझ्याशीं कां नको ?

**शारदा**—रेशमी शेल्याला सुताच्या दशीसारखी गरीबाची पोरगी मी ! शोभलें तरी पाहिजेना ?

**श्रीमंत**—हेंचना कारण ? अं: ! लग्न झाल्यावर श्रीमंताची होशील.

**शारदा**—दुसरं एक आहे.

**श्रीमंत**—दुसरं कोणतं ?

**शारदा**—सांगतें पण—

**अंजनी गीत**

**वाटुं न द्यावा विषाद चित्ता ।। सत्य दिसे तें वदतें आतां ।।**
**वयें अजोबा माझे दिसतां ।। नात दिसे मी ही ।।**

**श्रीमंत**—( **खवळून** ) काय ? मी वयानं आजोबा दिसतों का ? म्हणजे अर्थात् तूं आम्हांला म्हातारा ठरविलंस ! आमच्याशीं असं उद्धटपणानं बोलायला तुम्हींच शिकवलंत का, असं जाऊन तुझ्या बापाला विचारतों.

**शारदा**—मला खरं वाटलं तें मी बोललें.

**श्रीमंत**—काय ? काय, मी म्हातारा हें तुला खरं वाटलं ? तुम्हांला असंच वाटतं का, म्हणून कांचनभटाला विचारतों.

**( रागानें निघून जातो. )**

**शारदा**—देवा ! हें काय झालं ! करायला गेलें एक आणि झालं भलतंच. आतां बाबा संतापून माझी काय दशा करतील कोण जाणे !

**पद्य**–( आलिंघन तो हे )

**खचित खचित हें नशिबाचि फुटकें ॥ म्हणुनि मला कोंडूनि या व्यसनीं ॥ पाजि बळें दुःखाचे घुटके ॥ धृ० ॥ सांगिल जनका हा भलभलतें ॥ प्राण खास घेईल तो हातें ॥ मीच देउं का लोटुनि तनुतें ॥ चुकतिल तरि चिंतेचे चटके ॥ १ ॥**

**कांचन०**—( **घाईनें येऊन** ) अग, कारटे ! काय बोललीस त्यांना ? नीट उत्तर दे, असं मीं सांगितलं, म्हणून तूं माझी अशी खोड मोडलीस वाटतं. चल आतां घराकडे !

**( तिला मारीत ओढीत नेतो. )**

---

# प्रवेश ४ था

**स्थळ**:—हेरंबमहालाच्या मागील फुलबाग.

**( कोदंड, श्यामसुंदर, गोरख )**

**कोदंड**—हिरण्यगर्भा, हा गोरख म्हणजे मला आज मारुतीच भेटला. याच्या साह्यानं मी बंधमुक्त झालों. परंतु याच्या उपकारबंधनांत सांपडलों; त्यांतून कसा मुक्त होईन तो होवो.

**गोरख**—छे ! छे ! महाराज ! जगावर उपकार करणारे आपण. आपल्यावर माझ्यासारख्या पामरानं काय उपकार करावे. माझ्या हातून आपली ही अल्पसेवा झाली, हाच मी देवाचा प्रसाद समजतों. नाहीं तर आम्ही निरंतर पोटाच्या पाठीं लागलेलीं पशुवत् माणसं, आम्हांला असा प्रसंग कधीं येणार ?

**कोदंड**—पाहिलंस, हिरण्यगर्भा ! मनाच्या मोठेपणाचा आणि उच्च-नीच वर्णाचा कांहीं संबंध नाहीं. ब्राह्मण असून त्या भद्रेश्वरानं अल्प स्वार्थासाठीं, अन्नावांचून माझा प्राण घ्यावा म्हणून मला तळघरांत कोंडून ठेवलं; आणि या गोरखानं आपलं केवळ जीवन, अशा चाकरीवर लाथ मारून मला त्यांतून मुक्त केलं.

**हिरण्य०**—शाबास गोरखा ! तूं खरा महात्मा आहेस !

**गोरख**—पण मला या महाराजांनीं त्या नीचाच्या गुलामगिरींतून सोडवलं, हें माझं केवढं कल्याण केलं ? कारण नीचसेवा म्हणजे नरकवास असं सांगतात.

**हिरण्या०**—( **स्वतःशीं** ) हर हर ! इतका वेळ आनंदाच्या भरांत माझं लक्ष गेलं नाहीं. पण तीनच दिवसांत मित्राची काय स्थिति झाली ही !

**कोदंड**—हिरण्यगर्भा ! हें काय !

**पद्य**–( असखीये मनिगे बारे. )

**दृष्टि भरे जलभारें, कां रे अनिवारें सुहृदा रे वद कारण मजला सारें ॥ धृ० ॥ मदर्थ धरुनी बल्लवपणही, विकत घेतला दासचि हा उपकारें ॥ १ ॥ भद्रेश्वर दे क्लेश बहुत परि, तदधिक दे तव शोक-विकल मुख बा रे ॥ २ ॥**

**हिरण्य०**—खरोखर ! तुझ्यासारख्या सत्पुरुषाचे हाल पहाणं मोठं कठीण! अरे नीचा भद्रेश्वरा ! तुला या अघोर कर्माचं प्रायश्चित्त मिळाल्यावांचून कधीं राहणार नाहीं.

**कोदंड**—अरे, मी तर यःकश्चित् ! माझे हे हाल म्हणजे कांहींच नव्हेत.

परंतु मोठमोठ्यांना कशा विपत्ति येतात, त्या पहात नाहींस ! हें व्रतच मोठं खडतर आहे.

**पद्य**–( राधा मनोहर )

**जो लोककल्याण ।। साधावया जाण ।। घेई करीं प्राण ।। त्या सौख्य कैचें ।। धृ० ।। बहु कष्ट जीवास ।। दुष्टान्न उपवास कारागृहीं वास ।। हे भोग त्याचे ।। १ ।। निंदा जनीं त्रास ।। अपमान उपहास ।। अर्थी विपर्यास ।। हें व्हावयाचें ।। २ ।।**

**गोरख**—आहा ! सन्मार्गीनं चालणाऱ्यांची ही स्थिति ! आणि हें जगन्नियंत्याला आवडतं !

**कोदंड**—अरे बाबा, ही कसोटी आहे. हिला उतरेल तोच खरा थोर. पण हिरण्यगर्भा, भुजंगनाथाच्या लग्नाचं कुठपर्यंत आलं ? झालं तर नाहींना ?

**हिरण्य०**—येत्या द्वादशीचा मुहूर्त ठरला आहे.

**कोदंड**—आहे, अजून बराच अवकाश आहे. बरं, तुझ्याविषयीं भुजंगनाथाला किंवा भद्रेश्वराला अद्यापि कांहीं संशय नाहींना आला ?

**हिरण्य०**—यत्किंचित्‌हि नाहीं. या वेळीं मीं अशी युक्ति लढविली आहे कीं,–( **कानांत सांगतो.** )

**कोदंड**—ठीक आहे. कांहीं अल्पकाळापर्यंत पूर्ववत् आहेस त्याच स्थितींत रहा, असं सांगणं म्हणजे माझा निर्दयपणा, परंतु त्यापासून आपलं बरंच कार्य साधणार आहे. मीं व हा गोरख जाऊन, ( **कानांत** ) असं असं करतों.

**हिरण्य०**—ठीक आहे. हे दयाघन परमेश्वरा ! माझ्या मित्रावर तुझं कृपाछत्र असूं दे. गोरखा, याला तुझ्या स्वाधीन केला आहे, संभाळ. जास्त काय सांगूं !

**गोरख**—माझी मान तुटून खालीं पडल्याशिवाय, यांच्या केसालाहि धक्का लागायचा नाहीं. मी तरी जास्त काय सांगूं ! कोदंड महाराज, चलावं, आतां या ठिकाणीं फार वेळ राहण्यांत धोका आहे.

**कोदंड**—हा मी तयार आहें. मित्रा हिरण्यगर्भा—

: साकी :

काकदृष्टि भद्रेश्वर घातक कपटी सावध मोठा ॥
संशय येतां घालिल आम्हां तोचि संकटीं उलटा ।।
यास्तव जपुनि रहा ।। माझीं चिंता नच वाहा ।। १ ।।

( सर्व जातात. )

---

## प्रवेश ५ वा

**स्थळ:**—कांचनभटाच्या घराजवळील रस्ता.

**शिपाई**—( **प्रवेश करून** ) मैतो सेटसाहेबका नौकरीमें बहोत ठोडी मुद्दतसे रहाहूं, इसलिये शहरकी ये बाजू मेरे देखनेमें अबतक नहीं आयी उसमेंभी इस मगरीबके वख्त उस कांचनभटका मकान मुझे कैसा मिलेगा ! ए शक्स, ए भाई, कांचनभट रहता है वो मकान कौन्सा ? क्या कहता है सुधे हातके चार मकान छोड जो गली जाती है, उसमेंका बाएँ बाजूका तिसरा ! बहोत ठीक कहा. खुदा तेरा भला करें ! ( **कांहीं चालून** ) क्या गलीच्छ गली है ये ! ये बम्मन इतने पाक ! और ऐसे नाकिसीमें रहते है ! यहि होगा ओ मकान. ( **जवळ जाऊन** ) अंदर कौन है ! अजी कांचनभट !

**इंदिरा०**—( **आंतून** ) कोण हांक मारीत आहे तें ? आलें आलें.

**शिपाई**—कांचनभट अंदर है ? नहीं. अच्छा उनको कहना के सेठ-सावका शिपाई आयाथा और सेटसावने तुमको हिसाबके वास्ते बुलाया है.

**इंदिरा०**—बरं सांगेन जा. ( **शिपाई जातो.** ) अगदीं करकरीत तिन्हीसांज झाली, तरी अजून शारदा कशी येत नाहीं ! आधीं तिला तिकडे आज दाखवायलाच कां न्यायची कोण जाणे. जयंता, जा बाळ ताईची गाडी आली कीं नाहीं पाहून ये. ( **जयंता जातो.** ) पुरुषांचं हें असं

चुकतं जिथं तिथं. बोलायला जावं, तर राख घालायला उठायचं. जयंता, आली का रे ?

**जयंत**—आई आई ! ताई एकटीच आली, आणि बाबा ग ?

**इंदिरा०**—कुठं जायचं असेल. बरं, तूं जा जेवायला. त्या बघ आत्याचाई हांक मारताहेत. ( **जातो.** ) ( **शारदेस पाहून** ) इतका ग कां उशीर ? वर ये, काय झालं ? त्यांनीं काय काय विचारलं ? तूं काय काय उत्तरं दिलींस ? का आपली बसली होतीस पायाचीं बोटं मोजीत ?

**शारदा**—( **येऊन आईच्या गळां पडून रडत** ) आई ! तुम्हीं काय आरंभलं आहे हें !

**इंदिरा०**—शारदे, भर दिवेलावणीच्या वेळीं हें ग काय ! झालं काय तुला ? खालीं बैस आधीं. ( **बसतात.** )

पद्य-( दूर तूं रुसुनि )

**रडसि काय म्हणुनि अशी सांग शारदे ।। कोण बोललें किं काय, मजसि समजुं दे ।। पुसुनि पुसुनि नेत्र पहा काय जाहले ।। पदर भिजुनि चिंब होय, गाल नाहले ।। भ्यालिस कीं काय कुणीं सांग मारिलें ।। मौन धरिसी हें मनास फार ताप दे ।। १ ।।**

**शारदा**—आई, काय सांगूं ग ! आणि सांगू तरी कसं !

पद्य-( गीत. )

**आम्ही गाई जातीच्या ।। नाहीं अम्हां वाचा ।। ती असती तरि तुमच्या ।। भेदितेचि हृदया ।। १ ।। अंतरिं जें जें सलतें सांगितलें मग असतें ।। गुपित अशा मारातें ।। नसतें सोशियलें ।। २ ।।**

**इंदिरा०**—शारदे, आज तुला कांहीं झालं तर नाहींना ! चल, तुझी दृष्ट काढतें अगोदर. कातरवेळेला आलीस, तेव्हांच माझ्या मनांत आलं.

**शारदा**—आई ! दृष्ट पडून चांगल्या चांगल्या देवांच्या मूर्तीसुद्धां फुटतात म्हणून ऐकतें. तशी जर मी कुणाची दृष्ट पडून फुटून, मरून जाईन तर किती चांगलं होईल म्हणतेस !

**इंदिरा०**—(**मनाशीं**) खास ! श्रीमंतांच्या घरीं कांहीं तरी कमजास्त झालं आहे. हें हिच तऱ्हेवाईक बोलणं ऐकून, नाहीं नाहीं तें मनांत येतं. (**उघड**) असं भलतंसलतं बोलूं नये शारदे ! देवघरांत चल. तुला कुळस्वामिणीच्या नांवानं अंगारा लावतें.

**शारदा**—आई, जिवंत समंधाच्या बाधेला कुळस्वामिणीचा अंगारा लावून काय होणार ? तूं आपल्या मायेची तीट लावशील, तर मात्र खास गुण येईल. आई, काय हवं तें कर; पण बाबांनीं लग्न ठरवलं आहे, तेवढं होऊं देऊं नकोस, तर तूं माझी खरी आई !

**इंदिरा०**—लग्नाचं ठरवलं त्यांत काय बिघडलं ग तुझं ? तुझ्यासारख्या गरिबाच्या मुलीला चांगलं सोन्यासारखं पालखीपदस्थाचं स्थळ मिळालं म्हणून मोठ्या आनंदानं असावंस, तें हें ग काय ?

**शारदा**—आई, पालखी खरी; पण ती मोडकी किडकी पालखी. पाय ठेवल्याबरोबर मोडूनसुद्धां जाईल कदाचित्. अशा पालखींत मला जबरदस्तीनं कां बसवतां ? ~~यापेक्षां असं~~ करानात—

पद्य-( जोगी : धुमाळी. )

**तुम्हि गरिब म्हणुनि जरि माझा ॥ घरिं भार तुम्हांला झाला ॥**
**तरि मीट बांधुनी माझी ॥ विहिरींत नेउनी ढकला ॥ मग मजहि**
**दुःख जगिं नाहीं ॥ तुमचाहि हेतु तो पुरला ॥ परि लोभ धरुनि**
**पैशाचा ॥ विकुं नका पोटचा गोळा ॥ १ ॥**

**इंदिरा०**—म्हणजे ? तुला आम्ही विकायला का काढली आहे ? खबरदार पुन्हां असं बोलशील तर ! मला नाहीं पत्करायचं ! म्हणतां म्हणतां फारच चेकाळलीस !

**शारदा**—(**रडत**) आई, माझ्या बोलण्याचा भाव तुला समजण्यासारखा असून, तूंच जर मला अशी झिडकारायला लागलीस तर मी मोकळ्या मनानं रडूं तरी कुणाजवळ ?

**इंदिरा०**—(**जवळ घेऊन**) रागावलें नाहीं. पण वडील माणसांच्या

करण्याला अशीं भलतींसलतीं नांवं ठेवूं नयेत. पैशापेक्षां तुझ्या सुखाची आम्हांला काळजी जास्त आहे, समजलीस !

**शारदा**—पुन्हां रागावशील, म्हणून बोलायचं भय वाटतं, पण आई, माझ्या सुखाची तुम्हांला काळजी आहे म्हणतेस, मग हें ग काय ?

**पद्य**–( ये अशी बैस मजसरसि. )

**यमपाश, गळ्याशीं ज्यास लागला, त्यास मला कां देतां ? ।। कां मांस विकुनि, धर्मास वांकडे जातां ? ।। चाल ।। पाळिलें घातलें खाया, अजवरी ।। बकरीस मोल बहु याया, ज्या परी ।। ही तुमचि मुलीवर माया, कां खरी ? ।। जगतांत, सदय सकळांत माउली तात, मुलीला असतां ।। मग तुम्हीच इतके कठोर कां गे होतां ? ।। १ ।।**

**इंदिरा०**—( **मनाशीं** ) ही आल्यापासून हिच्या बोलण्यावरून ते श्रीमंत अगदीं म्हातारे आहेत असं वाटतं. ( **वल्लरी व जान्हवी पडद्यांतून** ) इंदिराकाकू ! अहो काकू ! काय चाललं आहे ? शारदा आली का परत ?

**शारदा०**—आई, ही वल्लरी आली. हिला विचार म्हणजे तुझी खात्री होईल.

**इंदिरा०**—वल्लरी, अग जान्हवी, या वेळच्या कुणीकडं ग ?

**वल्लरी**—शारदेच्या लग्नाचं ठरलं, असं सकाळीं ऐकलं, म्हणून त्यासंबंधानं तुम्हांला कांहीं सांगायचं मनांत आलं; पण विनाकारण कुणाचं उणं सांगून लग्न मोडण्यांत पाप आहे म्हणतात, म्हणून इतका वेळ दम धरला होता, पण आतां सांगतेंच.

**इंदिरा०**—असं इतकं काय तें ?

**वल्लरी**—खरं वाटो, खोटं वाटो, तुम्हांला जर मुलीचं खरं खरं सुख पहायचं असेल, तर ठरविलं आहे, तिथं देऊं नका. आणि नुसत्या भपक्यावरच जायचं असेल, तर आमचं कांहीं म्हणणं नाहीं. होय कीं नाहीं जान्हवी !

**इंदिरा०**—पण ते श्रीमंत चांगले देखणे, तरणे, शहाणे आहेत असं तर मला घरांतून सांगणं झालं; आणि तुझं हें निराळंच बोलणं !

**वल्लरी**—कुठले तरणे, कुठले देखणे आणि कुठले शहाणे घेऊन बसलांत इंदिराकाकू; ! सगळं सोंग आहे. तुम्हांला आम्हीं मुलींनीं सांगायचं म्हणजे लहान तोंडीं मोठा घास घेतल्यासारखं होईल. पण त्या बहुरूपी श्रीमंतीला फसून त्या कुचक्या खोडाला आपली मुलगी विकूं नका. मी सांगतें यांतलं एक अक्षर खोटं असेल तर जीभ कापून देईन !

**इंदिरा०**—( **शारदेला कुरवाळून** ) उगीच ग बाई मी तुझ्यावर रागावलें ! हें इतकं कपट करायचं मला काय माहीत ?

**शारदा**—आई, खरंच का ग तुला माहीत नव्हतं ?

**वल्लरी**—यांना माहीत नव्हतं हें मीसुद्धां सांगतें. कारण तसं असतं तर असं झालंच नसतं !

**इंदिरा०**—शारदे ! तुझ्या गळ्याची शपथ माहीत नव्हतं. आतां अगदीं भिऊं नकोस. मला कांहीं तूं अधिक झाली नाहींस. तुझा जीव काय, आणि माझा जीव काय एकच ! समजलीस ? रडूं नकोस आतां.

**शारदा**—म्हणून तर आई मी येऊन तुझ्या गळीं पडलें ! पण ती बेगडी श्रीमंती पाहून बाबांच्या तोंडाला पाणी सुटलं आहे, आणि त्यांनीं मला खाईंत टाकायचं मनांत आणलं आहे, त्याला काय करशील ? माझे बाबा असे उलट्या काळजाचे नाहींत म्हणून मी या मुलींबरोबर किती भांडत होतें. पण—( **कांचनभट पडद्यांतून रागानें** ) काय, काय म्हटलंस पोरी ? पुन्हां बोल पाहूं !

**इंदिरा०**—( **चपापून** ) चोरून ऐकलं वाटतं सगळं. वल्लरी, त्या कोनाड्यांत करंडा आहे, कुंकू लावून घेऊन तुम्ही स्वयंपाकघरांतून चला आतां. आजचा रंग ठीक दिसत नाहीं. ( **बरं म्हणून त्या घाईनें जातात.** ) पोरी, तूं अगदीं बोलूं नकोस.

**कांचन०**—( **बाहेर येऊन** ) काय ग कारटे ? मी उलट्या काळजाचा आणि मी तुला खाईंत टाकणार आहें का ? फार फारशी जीभ लांब केलीस ?

**शारदा**—पण बाबा, मीं काय म्हटलं तें ऐकून तरी घ्या !

**कांचन०**—( **तिच्या अंगावर धांवून** ) काय, ऐकून काय घ्या. मी उलट्या काळजाचा हेंच कीं नाहीं ? आणि मी तुला खाईंत टाकणार ?

अग कारटे ! इतकी मस्त झालीस का ? ( **तिला मारीत** ) चल चालती हो. आत्तां नीघ माझ्या घरांतून.

**इंदिरा०**—( **सोडवीत** ) हें काय ! हें काय पण ! उगीच काय म्हणून पोरीला मारायचं ? शारदे जा, जा, स्वयंपाकघरांत; आत्याबाईजवळ जाऊन बैस.

**शारदा**—( **रडत** ) जन्म देणारेच मारायला लागल्यावर जायचं कुठं !

**कांचन०**—पुन्हां तोंड, पुन्हां तोंड करते ! मस्तवाल कारटी ! म्हणे तें स्थळ असंच आहे, म्हणे ती बेगडीच श्रीमंती आहे, तिथं म्हणे मला कां देतां ? जसं कांहीं कारटीचं स्वयंवरच चाललं आहे. गळ्यांत दावं बांधून मी विकीन तिथं तुला गेलंच पाहिजे.

**इंदिरा०**—हो ! दावं बांधून विकायला, माझी मुलगी म्हणजे गोठ्यांतली पारडीच कीं नव्हे ?

**कांचन०**—आतां तुम्ही आलांत वाटतं पोरीचा कैवार घेऊन ! तूंच, तूंच तिचे कान फुंकून तिला बिघडवलीस; नाहीं तर इतकं चुरु चुरु बोलायची तिची काय छाती होती ?

**इंदिरा०**—पोटांत दुखल्यावर कोणीहि ओवा मागेलच. पण तिळाएवढ्या पोरीला इतकं मारायला तिचा अपराध तरी काय ?

**कांचन०**—अपराध काय ? तुला कळला तर तूंसुद्धां झोडपशील पोरटीला. चांगली गाडींत घालून दाखवायला नेली. तिथं हिनं प्रत्यक्ष श्रीमंतांचा अपमान केलान. असल्या दांडग्या मुलीशीं आम्हांला विवाह कर्तव्य नाहीं, असं त्यांनीं मला स्पष्ट सांगितलं. त्यांच्या हातांपायां पडून पुन्हां त्यांची समजूत घालतां घालतां माझी पुरेवाट झाली. तिथून घरीं आलों, तो हा प्रकार !

**इंदिरा०**—पण इतकं हातांपायां पडायचं काय कारण ? ही दांडगी म्हणून जर त्यांच्या मनांतून उतरली असेल तर देवच पावला म्हणायचा अनायासें. माझ्या पोरिला तरी तसला जांबुवंत नवरा कुठं आवडतो आहे ?

**कांचन०**—म्हणजे ? तूंसुद्धां श्रीमंतांना जांबुवंत म्हणतेस कीं काय ?

**इंदिरा०**—सगळं गांव म्हणतं, म्हणून मी म्हणतें आणि म्हटलं तरी खरं तेंच म्हणतेंना ?

**कांचन०**—तुझ्यासारख्या तोंडाळ मूर्ख बायकोशीं घसा फोडून घेण्यांत अर्थ नाहीं. होय, ते पाऊणशें वर्षांचे जांबुवंत आहेत. पण त्यांच्या श्रीमंतीवर मी त्यांना मुलगी देणार. तुझं काय म्हणणं ?

**इंदिरा०**—देणार म्हणजे ? मी देऊं द्यायची नाहीं. नाहीं पोरीचं लग्न झालं तरी पुरवलं. जन्मभर तश्शी जवळ बाळगीन, पण पैशाच्या लालचीनं विकूं म्हणून द्यायची नाहीं.

**कांचन०**—पण तुला विचारतो कोण ! आणि त्यांत तुला कळतं काय? तुझी अक्कल म्हणजे तिखटमिठापुरती. श्रीमंतांशीं शरीरसंबंध करण्यांत किती लाभ होतो याची कल्पना तरी आहे काय तुला ? अग, उड्या पडताहेत उड्या !

**इंदिरा०**—पण आपल्या पोरीवर उदार होऊन कितीहि लाभ झाला तरी मला नको तो ! त्यांतून कांहीं कोंडा देऊन विकत घेतलेली नाहीं. चांगली एका जिवाची, एका हाडामांसाची आहे. तिला सुख होईल तिथ्थंच दिली पाहिजे.

**कांचन०**—बस् ! बस् ! तुम्ही बायका म्हणजे शुद्ध अडाणी जनावरं. घातलेलं खावं, दिलेलं नेसावं, आणि सांगितलेलं करावं हें तुमचं काम ! जास्त पंचाइतींत पडण्याची जरूर नाहीं. मी तिला तिथेंच देणार. नुसत्या तिच्या सुखाकडे लक्ष देऊन ! आपल्या घरीं धांव घेत येणाऱ्या लक्ष्मीला पाहून, दाराला अडणा लावणारा मी मूर्ख नव्हे, समजलीस !

**इंदिरा०**—आम्ही जनावरंच, तेव्हां आम्हांला काय कळतं ! पण पैशाकरितां आपली मुलगी म्हाताऱ्याला विकावयाची, हें मनुष्यांना शोभतं का ?

**कांचन०**—हो ! कां विकूं नये ? पूर्वीं कोणी विकली नाहीं, का पुढें कोणी विकणार नाहीं ? आणि विकल्याशिवाय आज चौदा वर्षं तिच्या पालनपोषणाकरितां झालेला खर्च कसा भरून येणार ?

**इंदिरा०**—( **कानांवर हात ठेवून** ) नको ग बाई ! हे शब्द सुद्धां ऐकायला नकोत ! इतकीं कशीं पुरुषांचीं मनं निर्दय म्हणतें मी !

पद्य-( मांड : दादरा. )

माया जळली कां ॥ तिळही ममता नाहीं कां ॥
आली पोटीं पोर एकटी, तीही विकितां कां ॥ १ ॥
लाजहि गेली कां ॥ मतिला भ्रमही पडला कां ॥
शोभा करितील लोक तयाची, चाडहि नाहीं कां ॥ २ ॥
द्रव्यचि बघतां कां ॥ तिजला पतिसुख नलगे कां ॥
वृद्धा देउनि तिला वांझपण, विकतचि घेतां कां ॥ ३ ॥

**कांचन०**— काय करावं हिला ! अग शहाणे ! तूं कधीं पाहिलं नाहींस का ? निदान ऐकलं तरी नाहींस का ? कीं—

: दिंडी :

दिल्या तरुणां तरि होति किती रंडा ॥
जरठ पतिही किती बघति नातवंडा ॥
सौख्य संतति सौभाग्य देव देई ॥
आम्हां हातीं त्यांतील कांहिं नाहीं ॥ १ ॥

**इंदिरा०**—( **संतापून** ) आग लागली त्या जिभेला ! मी म्हणतें मनाची नाहीं, पण जनाची तरी कांहीं चाड !

**कांचन०**—काय संबंध जनाचा ? माझी पोरगी मी वाटेल त्याला देईन !

**इंदिरा०**—म्हणजे माझी तिच्यावर मुळींच का सत्ता नाहीं ? मी तिला आणि जयंताला घेऊन आपली माहेरीं जातें कशी ? ( **रडूं लागते.** )

**कांचन०**—ठीक आहे ! उत्तम ! उत्तम ! जयंताला घेऊन जा, खुशाल जा. मी सुपारी लावून लग्न लावीन पोरीचं !

**इंदिरा०**—आणि तिच्यावर नाहीं का माझी सत्ता !

**कांचन०**— सत्ता असेल, पण मत्ता आहे माझी. म्हणे माहेरीं जातें, भय घालते मला. आण इकडे माझी ती संध्येची कळशी. ( **ती जाते.** ) असल्या कामांत असली तापट बायको उपयोगी नाहीं.

**इंदिरा०**—हं, ही कळशी ! ( **आपटते** ) आणि तो बाहेर कोणी सावकाराचा शिपाई आला आहे.

**कांचन०**—( **अंगरखा बंडी काढीत** ) तोच तो ! म्हणे पोरीला विकूं नका. मग तुला विकून त्या सावकाराचं कर्ज फेडूं का !

**इंदिरा०**—हें असलं कर्जाचं भय कुणाला घालायचं ! कवडी कवडी करून रुपयांच्या त्या दोन घागरी पुरून ठेवल्या आहेत, तें मला ठाऊक नाहीं वाटतं !

**कांचन०**—( **तिच्या अंगावर जाऊन** ) गप्प ! गप्प ! खबरदार पुन्हां चकारशब्द काढलास तर ! पुन्हां आणखी ! पैशाची किंमत कळत नाहीं, ती वायको कसली ! ( **रागारागानें अंगरखा बंडी फेंकून कळशी घेऊन जातांना** ) कुणी माझ्या गळ्यावर सुरी ठेवली तर त्या घागरीच मला वांचवतील. ( **जातो.** )

**शारदा**—( **बाहेर येऊन आईला मिठी मारून** ) आई, मीं सगळं बोलणं ऐकलं. आतां मला तारणार तूंच, आणि मारणार तूंच !

**इंदिरा०**—माझं तर मन बाई असं पेटल्यासारखं झालं आहे, काय करूं !

**शारदा**—मला या जगांत आणलीस, तशीच परत पोंचीव म्हणजे झालं !

**इंदिरा०**—( **चपापून** ) म्हणजे !

**शारदा**—आई !—

**पद्य**-( यहिबंदिसे पाया गं. )

**तूं टाक चिरुनि ही मान, नको अनमान ॥**
**नउ मास वाहिले उदरिं तिचा धरिं, कांहिं तरी अभिमान ॥ ध्रु० ॥**
**तो कसाव झाला तात ॥ करूं सजे मुलीचा घात ॥**
**मग बरा तुझा मउ हात ॥ जा विसरुनि माया सारी,**
**करीं घे सुरी, धरीं अवसान ॥ १ ॥ हें कठिण दिसे जरि**
**काज ॥ विष तरी जरासें पाज ॥ परि ठेवूं नको जगिं आज ॥**
**जी दुःख मुलीचें निवारिना ती माय नव्हे दुस्मान ॥ २ ॥**

**इंदिरा०**--आंत चल; वन्संना तरी कांहीं सुचतं का विचारून पाहतें.

( **तिला आंत घेऊन जाते.** )

# अंक ४ था

## प्रवेश १ ला

**स्थळः**—कांचनभटाचें घर.

**कांचन०**—या अलीकडच्या पोरी म्हणजे मोठ्या धाडसी ! त्या शुभंकराच्या मुलीला पोरीपोरींनीं सहज म्हटलं कीं, तुला नवरा पाहिला आहे तो बायकांसारखं बोलतो. हें ऐकल्यावरोबर तिनं जाऊन जीव दिला ! तसं जर कांहीं वेड आमच्या पोरीच्या डोक्यांत शिरलं तर आमचं हुंड्याचं, तैनातीचं, आणि त्यावर श्रीमंत होण्याचं मनोराज्य जागच्या जागीं ढांसळून जायचं. तें कांहीं नाहीं. आजचा आणि उद्यांचा दिवस डोळ्यांत तेल घालून पोरीला जपलं पाहिजे. एकदां तिच्यावर अक्षता पडून आमच्या पदरांत पुरी रक्कम पडली, म्हणजे अर्धा निश्चित झालों. मग तिनं कांहीं केलंन् तरी फार तर तैनातीलाच गोता बसेल. ( **आंत पाहून** ) काय ग ए, आज तरी जेवली का नीट ?

**इंदिरा०**—( **बाहेर येऊन** ) हं, जेवली म्हणजे काय ! मीं, तसंच तिच्या मामानं किती आर्जवं केलीं, तेव्हां कुठें अळंबळं दोन घांस खाल्लेन्. माझा दादा म्हणत होता,–आपलं बोलणं झालं तें सांगतें. असं कांहीं खेंकसायला नको अंगावर ! तो म्हणत होता, पोरीला जर त्या स्थळाचा इतका तिटकारा, तर काय रक्कम घेतली असेल तितकी मीं देतों, त्यांची त्यांना देऊन टाका, आणि दुसरं स्थळ पाहून मी माझ्या भाचीचं लग्न करणार ! यांत काय गैर आहे त्याचं म्हणणं ?

**कांचन०**--काय गैर नाहीं ? आं ! हा पहा ठरावाचा पक्का कागद झाला. आतां देवाला तरी फिरेल का लग्न ? तूं एक शहाणी, आणि तुझा दादा सात शहाणा !

**इंदिरा०**—आतां एक मेला झाला असेल कागद. पण मी त्याच्या अगोदरपासूनच ओरडतें आहे ना ? तिकडे कुणी लक्ष दिलं होतं ? आधींच आतांशीं पोरगी काळजीनं अगदीं अशी झाली आहे, त्यांतून आज दोन दिवस अन्न सोडलंन् आणि उद्यां जर कांहीं भलतंच मनांत आणलंन् तर मग कसं होईल ?

**कांचन०**—अग, म्हणूनच तुला सांगतों, कीं काय शहाणपण असेल तें दाखवायचा हाच प्रसंग आहे. आजन् उद्यां तिला संभाळ, कीं आपलं काम झालं. हें लग्न ठरवून मलासुद्धां पश्चात्तापांत पडल्यासारखं झालं आहे ! आहे कुठं ती ?

**इंदिरा०**—बसली आहे मागिलदाराच्या खोलींत.

**कांचन०**--मीच जाऊन तिची कांहीं समजूत काढतों. ( **जातो.** )

**इंदिरा०**—पण हें पहा, तिला माराबिरायचं नाहीं हो, सांगून ठेवतें. अगोदर हें असं कांहीं तरी वेड्यासारखं करायचं आणि मग पश्चात्तापांत पडायचं ! कसला मेला स्वभाव आहे कुणाला ठाऊक ! ( **जाते.** )

---

# प्रवेश २ रा

**( शारदा आपल्याशीं बोलत आहे. )**

**शारदा०**--मीं किती नको नको म्हटलं, तरी काळ कुठं ऐकतो आहे ? त्याचा आपला क्रम चालायचाच. पंधरा दिवसांचे आठ झाले, आठांचे चार राहिले, आणि चारांचं एकावर आलं. आजचाच दिवस काय तो मधें, आणि उद्यां ? उद्यां काय--

पद्य–( राम मही प्रणतपाल. )

**लग्न नव्हे मरण उद्यां ।। ठरलें तें टळत नाहिं ।। धृ० ।।**
**मातेची धरिलि कास ।। परि तुटली तीहि आस ।।**
**नवस बोलिलें शिवास ।। अजुनि कसा वळत नाहिं ।। १ ।।**

**ईश काळजी हरील ॥ तुजसि योग्य पति वरील ॥**
**वदला जो पुण्यशील ॥ तोहि कुठें कळत नाहीं ॥ २ ॥**

हें बाबांचं द्रव्याचं वेड मला भोंवतं आहे. आणि हें वेड घालविणारा मांत्रिक म्हणा, वैद्यराज म्हणा, या जगांत तरी कुणीं नाहीं म्हणतात. अशा मनुष्याचं मन रडण्यानं पाझरत नाहीं, कीं ममतेनं द्रवत नाहीं, भयानं भीत नाहीं, कीं रागानं डळमळत नाहीं, मग आतां करूं तरी काय ? असं अन्न-पाणी सोडून मरण येईल म्हटलं, तर झिजत झिजत कधीं काळानं येईल तेव्हां येईल ! तंवर बाबांचा मतलब साधून किती तरी दिवस होतील. म्हणून एकदां वाटतं, कीं अगदीं तिखट, कडू, झोंबणाऱ्या, चरका बसणाऱ्या शब्दांनीं माझ्या मनांत काय आहे, तें एकदां त्यांच्या तोंडावर बोलून टाकावं. फार झालं तर रागावतील, मारतील, जीव घेतील ! म्हणजे सुटेन तरी एकदाची ! पण असं कुठलं व्हायला ! तो मेला हुंडा येईलना मधें ! ( **आंत पाहून** ) पण हे बाबांच इकडे आले. अगबाई ? डोळे कां पुसताहेत ? माझ्याबद्दल वाईट वाटून कीं काय ? भलतंच ! माजघरांतून इकडं येतांना धूर लागून पाणी आलं असेल झालं !

**कांचन०**--( **येत येत** ) बाळे, काय करते आहेस ?

**शारदा**—प्रेम अधिक, कीं पैसा अधिक, याचा विचार करतें आहे. पण बाबा डोळे कां पुसतां ?

**कांचन०**—हा कन्याविरह मोठा कठीण आहे !

**शारदा**—बाबा ! किती कठीण असला, तरी तुमच्या मनापेक्षां तर कठीण नसेलना ?

**कांचन०**—मुली काय सांगूं ! कसं देऊं याचं उत्तर ! तुला मुलंबाळं होऊन अनुभवानंच कळेल तेव्हां कळेल. तुला लहानाची मोठी केली, अशक्ताची सशक्त केली, अज्ञानाची सज्ञान केली, आणि उदईक मीच तुला दुसऱ्याच्या स्वाधीन करणार, हा विचार मनांत येऊन, वरचेवर असं भडभडून येतं कीं काय सांगूं ! तूं तिकडे श्रीमंतीच्या वैभवावर लोळूं लागशील; तुझं ठीकच आहे. पण उद्यां गेलीस म्हणजे, बाळे ! माझं घर उदास दिसायला लागेल ! ( **रडूं लागतो.** )

**शारदा**—दिसायला लागेल खरंच; पण बाबा, एवढा सोन्याचा गोळा यायचा आहे, त्याच्याकडं पाहून कसं तरी दुःख गिळून टाका झालं! काय करणार! शिवाय त्याच सोन्याच्या प्रकाशानं घरहि चांगलं शोभिवंत दिसेल नाहीं?

**कांचन०**—हें हें तुझं कुचकं बोलणं! माझं अंतःकरण किती कोंवळं आहे, हें तुला माहीत नाहीं. मी तुझं लग्नसुद्धां करणार नव्हतों, पण ब्राह्मणांच्या मुलींचीं लग्नं झालींच पाहिजेत, असं शास्त्र आहे, तिथं इलाज नाहीं!

**शारदा**—आणि ब्राह्मणांच्या मुली म्हाताऱ्यांना विकाव्या, असंहि शास्त्र आहे, नाहीं बाबा?

**कांचन०**—( **स्वगत** ) ही फारच बोलायला लागली! दाखवूं का एकदां नारसिंह अवतार! पण नको! अवघे दोन दिवस उरले आहेत. ( **उघड** ) तूं वाटेल तें बडबड, पण मी तुला श्रीमंतांना द्यायची केली, ती केवळ तुझ्या सुखाकरितां!

**शारदा**—हो हो! यांत काय संशय! तशी मी लाडकीच आहें तुमची, पण बाबा, त्यांना देण्यांत असं कोणतं सुख पाहिलं आहे माझं?

**कांचन०**—कोणतं सुख! अग नोकरचाकर, दागदागिने खाणंपिणं वस्त्रपात्र यांचं सुख घेशील तें निराळंच. पण या तुझ्या गरीब बापाला दारिद्र्यांतून काढशील हें केवढं बरं सुख होईल तुला? वेडी कुठली!

**शारदा**—खरंच वेडी मी! बाबा तुमचं दारिद्र्य दूर करण्यासाठीं देवानं मला तुमच्या पोटीं घातलीन्, हें इतके दिवस माझ्या ध्यानांतच आलं नाहीं! तेव्हां एक नव्हे शंभर वेडी! आणि तुम्हीच जतन करून वाढविलेली, तुमची मुलगी, तुम्हीच विकणार, त्यांत वाईट तें काय? पण मेली माझी पोरबुद्धि! म्हणून मला उमज पडला नव्हता. आतां माझं कांहीं म्हणणं नाहीं. एक मात्र करा. कीं—

पद्य–( लक्ष्मी प्रभूसी म्हणे )

**मागिल जन्मींचें, अतांचें, मी ऋण देणें असेल तितकें फेडून घ्या तुमचें ॥ १ ॥ तुमचें मजवरचें, असें तें, प्रेम धनाचें, नव्हे मनाचें,**

**कळलें मज पुरतें ॥ २ ॥ पुढच्या जन्मि तरी, शिरावरि, भार न ठेवा, हे मानिन मी उपकारचि भारी ॥ ३ ॥**

**कांचन०**--समजलों समजलों, तात्पर्य समजलों त्यांतलं. आमचं करणं वावगं असं एकदां तुझ्या मनानं घेतलं आहे. पण लग्न होऊन दोन मुलं झालीं; म्हणजे त्यांना पहायला येईन तेव्हां देईन याचं समर्पक उत्तर. हे माझे आतांचे शब्द विसरूं मात्र नकोस, बरं का?

**शारदा**--तें मी विसरेन म्हटलं, तरी व्हावयाचं नाहीं. मात्र मुलं पहायला याल, कीं काय असेल नसेल त्यासकट मला परत घरीं घेऊन जायला याल, येवढं पहायचं आहे.

**कांचन०**--बरं बरं! ( **जातो.** )

**शारदा**-- इतकं लावून बोललें, तरी कांहीं नाहीं. खरंच आहे; किती पाणी घातलं, तरी वठलेल्या वृक्षाला का पालवी फुटणार आहे? ( **दचकून** ) अगबाई! हें पाय आपटीत आपटीत कोण येत आहे? मामा हें काय? तूं इतका संतापलेला कां दिसतोस?

**मामा**--कोण नाहीं संतापायचा? तुझ्याकरितां तुझ्या बापाचीं मीं इतकीं आर्जवं केलीं, पण त्याला माझी कांहींच किंमत नाहीं.

**शारदा**--मामा, कशाला गेलास बरं त्यांचीं आर्जवं करायला? मीं आतां माझ्या अदृष्टांत काय असेल तें भोगायला अगदीं तयार झालें आहे. ( **रडत** ) प्रत्यक्ष चितेबरोबर जरी माझं लग्न लावलं तरी मी बोलायची नाहीं.

**मामा**--तें कां पण? मी जिवंत असतांना तूं इतकी निराश कां होतेस? माझ्याहि अंगांत ईश्वरानं सामर्थ्य दिलं आहे. चल मी करणार तुझं लग्न.

**शारदा**--म्हणजे काय मामा? मी नाहीं समजलें!

**मामा**--अग तुझ्या बापाला मीं सांगितलं, त्या श्रीमंतांकडून काय रक्कम घेतली असेल ती परत करा. तुमच्याजवळ नसेल तर मी देतों; मी दुसरं चांगलं स्थळ पाहून स्वतःच्या खर्चानं शारदेचं लग्न करतों; पण त्या म्हाताऱ्याला मुलगी देऊं नका. परंतु तुला काय सागूं शारदे! तुझा बाप

म्हणजे प्रत्यक्ष ब्रह्मराक्षस ! मला काय म्हणतो, ' माझ्या मुलीच्या लग्नांत तुम्हांला बोलायचं कारण काय ? मीं ठरविलेलं स्थळ तुम्हांला आवडत नसेल, तर आलांत तसे चालते व्हा !' हे त्याच्या तोंडचे शब्द ऐकले मात्र, आणि काय झालं तें झालं ! त्याच ठिकाणीं मनांत निश्चय केला कीं, तुझ्या, आईबापांना न विचारतां माझ्या घरीं नेऊन, दुसरं उत्तम स्थळ पाहून तिथं तुझं लग्न करायचं. बोल, हा माझा विचार तुला पसंत आहे कीं नाहीं ?

**शारदा**—माझ्यासाठीं तुझं मन इतकं कळवळून, माझं कल्याण व्हावं म्हणून हा निश्चय केलास, हे माझ्यावर तुझे डोंगराएवढे उपकार झाले; पण हा तुझा विचार अंमळ कसासाच दिसतो मला.

**मामा**—कां ? त्यांत काय गैर दिसतं तुला ?

**शारदा**—अरे, आईबापांना न कळवितां मुलीनं निघून जायचं हें तुला तरी बरं दिसतं का ? वडिलांनीं दिलेल्या ठिकाणीं माझं कांहीं झालं तरी लोक मला दोष द्यायचे नाहींत, त्यांना माझी दयाच येईल. पण तूं सांगतोस तसं केलं, आणि जरी मोठ्या सुखांत पडलें तरी, लोक माझी जन्मभर निंदाच करतील.

**मामा**—या कामांत लोक तुला खास खास नांवं ठेवणार नाहींत. आणि ठेवायलाच लागले, तर मी सांगेन त्यांना काय सांगायचं तें.

**शारदा**—( **रडत** ) असं कसं म्हणतोस मामा ! चांगल्यालासुद्धां लोक नांवं ठेवतात, मग वाइटाला का ठेवायला राहतील ? त्यांतून आम्हां बायकांच्या नांवाला इतकी देखील दांडगाई खपत नाहीं, अगदीं पारिजातकाच्या फुलाहूनसुद्धां नाजूक आमचं नांव. म्हणून हात जोडून सांगतें, मामा ही गोष्ट पुन्हां काढूं नकोस. माझे बाबा मला विकोत, विहिरींत लोटोत, अन्नावांचून मारोत, कीं पुरून ठेवोत; पण तूं म्हणतोस तसं कांहीं माझ्या हातून व्हावयाचं नाहीं. म्हणून सांगतें—

**पद्य**–( कन्यकासीं आम्हां. )

**कोणि कांहीं नका शिकवुं आतां ॥ दोष लावूं नका व्यर्थ ताता ॥**
**देइ हातें मला तात ज्यासी ॥ लग्न होतांचि तो देव मजसी ॥ १ ॥**

( जाते. )

**मामा**—जा, तूं तरी त्याचीच पोरगी कीं नाहीं ? मीच इथें रहात नाहीं. मग मागें कांहीं का होईना ? ( **जातो.** )

---

## प्रवेश ३ रा

**स्थळः**–हेरंबमहाल.

**श्रीमंत**—कोण आहेरे पहाऱ्यावर ? घटका भरली कीं नाहीं अजून ?

**पहारेकरी**—नाहीं सरकार. थोडा अवकाश आहे.

**श्रीमंत**—इतका वेळ झाला तरी अजून अवकाश आहे ? ( **खिडकींतून पाहून** ) हा सूर्यसुद्धां मघाशीं होता तिथंच आहे ? कांहीं नादांत गुंतून चालायचं विसरला कीं काय ? एकच दिवस राहिला आहे, पण किती सावकाश चालला आहे.

**पद्य**–( हठ जावो. )

**पल घडी, घडी दिन भासतसे ॥ दिनहि वर्षसा दीर्घ दिसे ॥**
**त्यांतुनि आम्हां पोक्त वरांना ॥ पळ जाई तो प्राण असे ॥ १ ॥**

**शाम**--( **आंत जाऊन** ) सरकार एकानं हा लखोटा आणून दिला; आणि तो आपणच स्वतः वाचून पहावा, अशी त्याची इच्छा आहे.

**श्रीमंत**—( **लखोटा घेऊन** ) कोण तो ?

**शाम**—हें मी त्याला विचारणार होतों, इतक्यांत तो निघून गेला सरकार.

**श्रीमंत**—बरं तूंहि जा निघून, बाहेर उभा राहा. हांक मारीन तेव्हां ये. ( **शाम जातो. श्रीमंत लखोटा उघडून पहातात व उपनेत्र लावून**

**वाचूं लागतात.** ) "हा एक प्रासादिक फटका, वाचून येईल रागाचा झटका, पण यांतील अनुभव नसे लटका." असा काय फटका आहे, तो वाचून तरी पाहूं—

**: फटका :**

**भल्या माणसा दसलाखाची गोष्ट सांगतों फोडुं नको ॥**
**पन्नाशीची झुळुक लागली बाइल दुसरी करूं नको ॥**
**भटें तटें तीं फुगा फुगवितिल त्यांच्या नादीं फुगूं नको ॥**
**सगे सोयरे भीड घालतिल परी भरीला पडूं नको ॥**
**कळी कोंवळी तुला कशाला पिशापरी ती खुडूं नको ॥**
**थोडी उरली कळ सोसावी पोर कुणाची नाडुं नको ॥ चाल ॥**
**कुणीं खुलविला खुलूं नको ॥ तरणा म्हणतां झुलूं नको**
**फसव्या पाण्या भुलूं नको ॥ तुझें तूंच अवसान ओळखी**
**भोल्यावरती चढुं नको ॥ फुकट तमाशा लोक पाहतिल**
**दहांत हांशा पिकवुं नको ॥ १ ॥**

( **रागानें कागद फाडीत** ) काय उपद्व्यापी लोक आहेत पहा ! म्हणे पन्नाशीची झुळुक लागली दुसरी बाइल करूं नको. आणि भोल्यावर चढूं नको आणि तुझं तूंच अवसान ओळख ! अरे शहाण्या ! अवसान ओळखल्या-शिवायच का इतका पैसा उधळला ? आणि सांगतो 'थोडी उरली कळ सोसावी' फुकट उपदेश करायला यांचं काय जातं ! आमचे हाल आम्हांलाच ठाऊक ! शामसुंदर, चल ये इकडे असा. ( **तो येतो** ) हं, हे घे तूं आणून दिलेल्या फटक्याचे तुकडे. असाच जा, हे सगळे जाळ, आणि याची राख नेऊन नदींत फेंकून दे. हंसतोस काय ? जा आधीं. ( **तो जातो** ) पळून गेलेला कोदंड परत येऊन त्यानं तर ही टवाळी केली नसेलना ? चला दीक्षिताला बोलावून आणून विचारूं. ( **जातो.** )

---

# प्रवेश ४ था

( दीक्षित येतो )

**दीक्षित**—इतक्या बंदोबस्तानं तळघरांत कोंडून ठेवलेला कोदंड ज्या दिवशीं आमच्या हातावर तुरी देऊन निसटून गेला, त्याच दिवशीं आमची ग्रहदशा फिरली ! पण ग्रहदशा म्हणण्यापेक्षां आमचीच अक्कल गेली असं का नाहीं म्हटलं ! कारण धोतरांत निखारा बांधावा त्याप्रमाणं कोदंडाला बाळगला ह्याच मूर्खपणा केला. आज तो फिरून गांवांत आल्याची बातमी लागल्यापासून कांहीं भलभलतींच स्वप्नं पडूं लागलीं आहेत. प्रसंग तर असा बिकट आला आहे, कीं बोलून सोय नाहीं. दोघेहि आमच्या अंतरंगांतले इथले मोठे अधिकारी एकाएकीं स्थानभ्रष्ट झाले; आणि त्यांच्या जागीं आलेले शुद्ध तुळशीपत्र ! त्यांनासुद्धां या दीक्षितानं डागळलं असतं; पण अवकाश नाहीं उरला. आज संध्याकाळीं लग्न, हें लग्न निर्विघ्न पार पडलं, तर आमची मध्यस्थी, बक्षिस, संभावना, वगैरे वगैरे पुष्कळच आहे. पण जर का कोदंडानं मध्येंच येऊन बिब्बा घातला तर, सगळंच आटपलं ! तेव्हां सध्यां असा प्रश्न आहे कीं, भुजंगनाथ चतुर्भुज होणार कीं आम्ही होणार ? भुजंगनाथ चतुर्भुज झाला म्हणजे सहकुटुंब झाला, तर दोघांचंहि साधेल; आणि आम्ही चतुर्भुज झालों, तर दोघांनाहि बाधेल. तें कांहीं नाहीं; भुजंगनाथ मरेना तिकडे ! आपण आपला बचाव केला पाहिजे. आणि याला उत्तम मार्ग म्हणजे “ यः पलायते ! ! ” पण हा भित्र्याचा मार्ग ! आपण प्रसंगाला तोंड देऊन युक्तिप्रयुक्तीनं आपला बचाव करणार ! कारण लाभ होण्याचा संभव आहे तो कां दवडा फुकट ! त्यांत शहाणपणा एवढाच करायचा, कीं या दीड दोन महिन्यांत हातचलाखीनं जें जडजवाहीर, सोनंनाणं आम्हीं अदृश्य केलं आहे, तेवढं कुटुंबापाशीं पोंचेल असं करावयाचं. मन दुर्दैवानं इकडे आम्ही कैदेंत पडलों तरी बेहेत्तर ! हो, एवढा ब्रह्मदेव ! तो सुद्धां कैदेंत पडला होता, मग आमची काय कथा ! बरं, हें काम सोंपविण्याजोगा विश्वासु हुषार मनुष्य आपल्याजवळ कोण आहे ? आपला कानीफ ? छे ! तो विश्वासु आहे पण अडाणी !

कोणीं कांहीं विचारलं, तर मतलब संभाळून जाब देणारा नव्हे. बरं गोरखाच्या जागीं ठेवलेला तो गंगाप्रसाद? अहं! तोहि कुचकामाचा! हुषार आहे, पण अतिशय पापभीरु. यांत त्याला कांहीं संशय आला तर भलतंच करून बसायचा. राहतां राहिला शामसुंदर! आहा! योग्य आहे. कारण ब्राह्मण आहे. चला; प्रथम त्याला चांगला सुवर्णमंत्रानं भारून, त्याच्या स्वाधीन ती पेटी करून द्यावा पाठवून, तूर्तातूर्त हाच घाट बरा दिसतो.

**( पडद्यांतून कोणी हांक मारतो, त्यांस 'आलों' म्हणून जातो. )**

---

# प्रवेश ५ वा

**स्थळ**—रस्ता.

**जान्हवी**—( **मोठ्यानें** ) अग वल्लरी! चल कीं ग लौकर; तासभर नटणं चाललं होतं, तरी आणखी काय राहिलं आहे?

**वल्लरी**—( **येत येत** ) अग बाबांनीं हांक मारली, म्हणून दरवाजापर्यंत आलेली पुन्हां परत गेलें. बरं श्रीमंतांच्या लग्नाबद्दल तुला कांहीं गुणगुण कळली आहे का?

**जान्हवी**—नाहीं ग बाई! कसली गुणगुण?

**वल्लरी**—( **मागें पाहून** ) दम धर. हे मागून ब्राह्मण येत आहेत ते जाऊं देत म्हणजे सांगतें.

**( चार-पांच ब्राह्मण बोलत येतात. )**

**शितिकंठ**—अहो पुष्करभट! तो कोदंड म्हणून या श्रीमंतांजवळ पुराणिक होता तो! तो कांहीं आजच्या लग्नांत घोंटाळा करणार आहे म्हणे!

**पुष्कर**—खरं कीं काय! करणारच असेल; तर त्याला म्हणावं लग्नाची दक्षणा आटपल्यावर मग तरी कर! कारण ही दक्षणा कांहीं चकारी-

पकारीवर भागायची नाहीं. किमान पक्ष ( **पांच बोटें दाखवून** ) वाणसंख्या तर खरी ?

**कौस्तुभ**—चला तर तिकडेच जाऊं, लग्न झालं तर दक्षणा मिळतेच आहे आणि कांहीं घोंटाळाच झाला तर तीच मौज पाहूं ! इथं काय ! आम्ही सांगूनसवरून भिक्षुकबच्चे ! बारसं असो, कीं बारावा असो, आम्ही आपले आहोंतच ! **( जातात. )**

**वल्लरी**—हें ऐकलंस जान्हवी ? आणि बाबांनीं मला हांक मारून हेंच सांगितलं.

**जान्हवी**—असं जर कांहीं होऊन लग्न मोडलं, तर खरंच, मी साखर वांटीन देवाला ! पण सुवर्णशास्त्री यायचेच आहेत ना लग्नाला ?

**वल्लरी**--अहं ! ते आतांशा तिकडे जातच नाहींत. काय तर दिक्षितांचं आणि बाबांचं माडीवरल्या खोलींत केवढं भांडण झालं म्हणतेस ! मी दाराशीं कान लावून ऐकत होतें. बाबा त्यांना म्हणाले, कीं मुकाट्यानं ठरल्याप्रमाणं आज संध्याकाळच्या आंत काय ती व्यवस्था झाली पाहिजे, नाहीं तर मी हें सगळं प्रकरण कोतवालींत देईन.

**जान्हवी**—हा काय घोंटाळा आहे ईश्वर जाणें. यांत त्या बिचाऱ्या शारदेचं कांहीं वाईट होऊं नये, एवढंच माझं देवापाशीं हात जोडून मागणं आहे.

**वल्लरी**--खरंच, कुठला मेला तो तोतया थेरडा श्रीमंत इथं आला ! आणि त्याला आपली पोरगी विकायची कांचनभटाला तरी कुठली दुर्बुद्धि झाली कोण जाणें बाई !

**जान्हवी**—मघाशीं तुंगा तिच्याकडून आलेली भेटली—कुणाला बोलवायला चालली होती वाटतं. ती सांगत होती, कीं शारदा गौरीहारापुढें बसून रडते आहे सारखी ! पूजेकडे कांहीं तिचं लक्ष नाहीं.

**वल्लरी**--बरोबरच आहे गौरीच्या नि हाराच्या पूजेकडे तिचं लक्ष लागेल तरी कसं बरं ! कारण—

पद्य-( ' दक्ष धुरंधर प्रलय भयंकर ' या चालीवर )

हिमनग जो पाषाणहृदय तो प्रसवे कन्यागौरीला ।।
निष्ठुरतेचा अवगुण त्याचा अंगिं तिच्याही तो आला ।। १ ।।
स्वयंवरीं पाहोनि जियेनें म्हातारा शिव पति केला ।।
भक्ति तिच्यावरि जडेल कैशी योग्य नव्हे ती पूजेला ।। २ ।।

जान्हवी—ती तर त्या वेळीं अल्लडच होती म्हणा, तेव्हां तिला इतका कुठला पोंच ? पण हरा तूं तरी चांगला पोक्त, विचारी होतास ना ? मग–

पद्य–( लावणीची चाल. )

वृद्धपणीं ती नवदारा ।। केलि कशाला मदन-हरा ।।
रीत घातली त्वां क्रूरा ।। अनर्थ त्याचा हा सारा ।।
मार्ग आवडे जो थोरां ।। इतरां वाटे तोच बरा ।।
अशा मुलींचे शिव्या शाप ते, तुझ्याच माथीं कुविचारा ।।
पडतिल सारे इंदुधरा ।। १ ।।

वल्लरी––पण जान्हवी, अग तें बघ वाजायला लागलं ! चल चल लौकर !

---

## प्रवेश ६ वा

स्थळः––लग्नमंडप.

[ शास्त्री, वैदिक, भिक्षुक, गृहस्थ बसले आहेत. एकीकडे बायकांची गर्दी; मागच्या बाजूस शिपाई प्यादे वगैरे उभे आहेत. बाहेर मंगलवाद्यें वाजत आहेत. बोहल्याजवळ वधूवरें उभीं आहेत, मंगलाष्टकें म्हणून त्यांवर अक्षता टाकीत आहेत असा प्रवेश. ]

श्लोक–( मंगलाष्टकें. )

झाला सांग विवाह, शंभु मग ये, कैलासिं गौरीसवें ।।
गौरीला दुसरी जरा सवत ती, तीतें न तें सोसवे ।। १ ।।

**बोले क्रोधवशा, अशा विवशिला, कां आणिलें रे घरा ॥**
**म्याली ऐकुनि ती उमाच वधुचें कुर्यात् सदा मंगलम् ॥ २ ॥**
**जाईची कलिका वधू, वर दिसे धत्तूर हा वाळला ॥**
**पूर्णेंदु-प्रतिमा वधू, वर दिसे राहूच कीं वांकला ॥**
**मीनाक्षी सुरदा वधू, वर रदांवांचूनि मंदाक्ष हा ॥**
**लावी जोड कुलाल, तोचि वधुचें कुर्यात् सदा मंगलम् ॥ ३ ॥**

**( पडद्यांत. )**

अहो धर्मशास्त्राचा खरा अभिमान बाळगणारे वैदिक गृहस्थहो, अहो उभयपक्षांकडील याज्ञिक उपाध्याय हो, थांबा, थांबा ! नाहीं तर महादोषाचे अधिकारी व्हाल. **( हें ऐकून सर्व चकित होतात व ' कोण ! कोण हो ! ' असें परस्परांस विचारूं लागतात. )**

**दीक्षित—( स्वगत )** दुसरा कोण ! कोदंडच हा. मला, या प्रसंगीं यत्किंचित्‌हि न डगमगतां, प्रसंगावधान, गांभीर्य, धैर्य, चातुर्य, युक्ति इत्यादि सर्व आयुधं सज्ज ठेविलीं पाहिजेत. **( उघड )** अहो जोशीबुवा, उपाध्येबुवा, तुम्ही कां थांबलांत ? चालूं द्या. तो असेल कुणी गांवांतला भ्रमिष्ट, तुम्ही कशाला तिकडे लक्ष देतां ?

**कोदंड—( बाहेर येत )** सोडा, मार्ग सोडा ! अहो या अशा क्षेत्रांत, त्यांतून ब्राह्मणांत काय अधर्म हा !

**पद्य-**( दक्षगर्वराशी. )

**ब्राह्मण सारे जमलां । कैसा सोडुनि मग शास्त्राला ॥ द्विजविवाह हा चालला ॥ १ ॥ जनका धर्म न दिसला ॥ कांचनतेजानें तो दिपला ॥ कां धना तुम्हीहि भाळलां ॥ २ ॥ काश्यपगोत्रीयाला ॥ करितां तद्गोत्रज ही बाला ॥ कां अंध असे जाहलां ॥ ३ ॥**

**उपाध्याय—**काय ? काय ? श्रीमंतांचंहि काश्यप गोत्र । विष्णवे नमः ! विष्णवे नमः ! कायहो, कांचनभटजी ! काय म्हणतात हे ?

**कांचन०**—ते अगदीं असत्य बोलतात. प्रत्यक्ष दीक्षितांनीं श्रीमंतांचं गोत्र कौशिक म्हणून मला सांगितलं आहे. कां हो दीक्षित ?

**दीक्षित**—हो सांगितलंच. आणि तें कांहीं पदरचं नाहीं सांगितलं ? चालूं द्या. या वेड्याला नेऊन कोतवालाच्या स्वाधीन करतों. कोण आहेरे ! अरे ए !

**कोदंड**—काय हो श्रीमंत, तुमचं गोत्र काय बोला ?

**श्रीमंत**—( **स्वगत** ) तरी मी या दीक्षिताला म्हणत होतों, कीं नको हें लग्न ! हा कोदंड आमच्या मुंडवळ्या हिसकावून घेणार. ( **कोदंडास** ) आमचं गोत्र काश्यप–

**दीक्षित**—( **ओरडून** ) कोदंडा, चल माझ्याबरोबर कोतवालाकडे. तिथें सांगतों श्रीमंतांचं गोत्र. ( **कोदंडास ओढणार इतक्यांत**— )

**कोदंड**—आपण कशाला घेतां इतके श्रम ! हे पहा कोतवालसाहेबच इकडे आले. कोतवालसाहेब, हेच ते दीक्षित महाराज ! मी यांचं गुह्य फोडीन, म्हणून मला तीन दिवस अन्न-पाण्यावांचून तळघरांत कोंडून ठेवलं तें यांनींच !

**दीक्षित**—कुभांड ! कुभांड !

**श्रीमंत**—( **स्वगत** ) माझ्या डोळ्यांपुढें काळ्या-पिंवळ्या रेषा दिसायला लागल्या.

**दीक्षित**—कोतवालसाहेब, शुद्ध कुभांड !

**कोतवाल**—अलबत, कुभांडच असलं पाहिजे. कारण आपल्यासारख्या वयोवृद्ध, तपोवृद्ध पवित्र ब्राह्मणाकडून असा निंद्य घातकी प्रकार होईल कसा !

**दीक्षित**—कोतवालसाहेब, तोंड आहे म्हणून बोलतात झालं. आपण राजाचे नेत्र, आपण राजाचे कर्ण, न्यायदेवतेचे दंडधारक आणि गोब्राह्मणांचं पर्यायानं पालन करणारेहि आपणच आहांत. म्हणून आपल्यापुढं ब्रह्मकुळाला स्मरून खरं खरं सांगतों, या कोदंडानं श्रीमंतांची मोत्यांची कंठी चोरली, म्हणून आम्ही याला धरून पूर्वीच्या कोतवालसाहेबांकडे पाठवीत असतां हा पळून गेला. असा वास्तविक प्रकार असून, हा कोंडून

ठेवलं असं म्हणतो, मर्जी याची. या कलियुगांत जर पूर्वीप्रमाणं देवता जागृत असत्या, तर याची जिव्हा इथल्या इथं गळून पडली असती. असो, आपण किंचित् बाजूला याल तर ती कंठी आपल्याला दाखवून आपली चांगली खात्री करून देतों.

**कोतवाल**—बस बस ! कंठी पाहून खात्री करून घेणारा तो पूर्वींचा कोतवाल मी नव्हे. अरे या हरामखोरावर नजर ठेवा चांगली. बरं, कोदंड, तुमची त्या तळघरांतून मुक्तता कुणीं केली म्हणून सांगितलंत ?

**कोदंड**—तो शामसुंदर येत आहे, त्यानं या गोरखाच्या साह्यानं माझी मुक्तता केली.

**शाम०**—( **येऊन** ) कोतवालसाहेब, या दीक्षितांनीं आज सकाळीं माझ्याजवळ ही जडजवाहिराची पेटी देऊन सांगितलं ( **पेटी पाहून दीक्षित ' घात झाला ' असें म्हणतो** ) कीं गुप्तपणानं माझ्या गांवीं जाऊन, माझ्या कुटुंबाजवळ ही पेटी देऊन परत ये; म्हणजे तुला उत्तम इनाम देईन. मला यांचा संशय देऊन मीं थोडी चौकशी केली, तेव्हां त्यांत कांहीं भानगड आहे असं कळलं; म्हणून ही पेटी आपल्यापुढें हजर केली आहे. रीती-प्रमाणं व्यवस्था व्हावी.

**कोतवाल**—अरे या पेटीचं कुलूप फोडा पाहूं आणि तो खोडा आणा इकडे ! कां दीक्षित महाराज ! हें सुद्धां कुभांडच असेल ? या कलियुगांतले लोक काय खोटं बोलतात हो ! ( **शिपायांस** ) पाहतां काय ! याचं पागोटं आणि शालजोडी घ्या काढून, आणि चढवा खोडा !

**दीक्षित**—पण - पण—कोतवालसाहेबांनीं ऐकून घ्यावं. ( **हळूच** ) माझा धंदा मध्यस्थीचा; यांचं लग्न मी जुळवून दिलं म्हणून त्यांनीं मला हें जडजवाहीर बक्षिस दिलं, तें मीं याला विश्वासू समजून, याच्याबरोबर गांवीं पाठविणार होतों, यांत कोणता अपराध कोतवालसाहेब ? ( **शिपाई खोडा घालतात.** )

**कोतवाल**—समजेल लौकरच कोणता तो. रहा असा इथं उभा !

**दीक्षित**—रहातों ! संगमनाथा ! तूं साक्षी आहेस !

**कोतवाल**—काय हो श्रीमंत, हें जडजवाहीर तुम्ही या दीक्षिताला बक्षिस दिलं होतं का?

**श्रीमंत**—( **पाहून** ) मी! हें इतकं जवाहीर! आणि याला बक्षिस! महाराज स्वप्नांतसुद्धां नाहीं हो. हें यानं खास चोरलेलं आहे, याबद्दल याला चांगली शिक्षा ठोठावा.

**कोतवाल**—गप्प बैस थेरड्या! तुम्ही दोघेहि सारखेच नीच आहां!

**श्रीमंत**—आतां आमचं लग्न होत नाहीं!

**कोतवाल**—बरं कांचनभटजी, तुमचे स्नेही, आणि या दीक्षितांचे साथीदार ते सुवर्णशास्त्री कुठें आहेत.

**कांचन०**—ते गेले असतील कुठें मसणांत. पण कोतवालसाहेब, माझी कन्यादक्षिणेची रक्कम तेवढी यांच्याकडून देववा. अर्धी राहिली आहे—अडीच हजार!

**कोतवाल**—जरा थांबा. कोदंड, तो श्रीमंतांचा पुतण्या कुठं आहे?

**कोदंड**—तो आला पहा. अहो भैरवनाथ, इकडे या!

**श्रीमंत**—( **स्वगत घाबरून** ) कोण भैरवनाथ-माझा पुतण्या, माझा वैरी! इथं आला! मग झालं! भरलं आमचं आयुष्य! तो पहा, तो पहा आलाच!

**भैरवनाथ**—काकासाहेब वा! इकडे शंभर कोसांवर येऊन, श्रीमंतीचं सोंग घेऊन, नांव गांव बदलून, गोत्र चोरून, चतुर्भुज व्हायची, तुमची स्वतःचीच का क्लृप्ति?

**श्रीमंत**—( **अर्धांगवायूचा झटका येऊन पडत पडत** ) नव्हे या या-भ-भ-भ-बा-बा-मे-मे—

**कोतवाल**—अरे अरे! जा रे जा, वैद्याला बोलावून आण. ( **एक मुलगा जातो** ) अहो भटजी, तुम्ही दोघे तिघे याला त्या खोलींत घेऊन चला. ( **तसें करतात** ) अहो कोदंड, आम्हीं या दीक्षिताला घेऊन, हेरंबमहालाला जप्तीची मोहोर करून, चावडीकडे जातों. वैद्य येईपर्यंत

तुम्ही इथेंच रहा. गोरख, एक जवान घेऊन त्या सुवर्णशास्त्र्याला असेल तसा चावडीवर घेऊन ये. भैरवनाथ तूं चल आमच्याबरोबर. **(जाऊं लागतात )**

**कांचन०**—अहो कोतवालसाहेब ! हे श्रीमंत असे पडले, आणि दीक्षितांना तुम्ही घेऊन चाललांत, पण आमची हुंड्याची रक्कम !

**कोतवाल**—घ्या, दीक्षिताकडून घ्या !

**कांचन०**—दीक्षित ! हुंड्याची रक्कम टाका आणि मग चला कुठें ते ! अहो चाललांत काय ? माझी हुंड्याची रक्कम कोण देणार ? अहो कोतवाल-साहेब ! तेवढी तरी माझ्या स्वाधीन करा. अरे गेले ! अहो हुंडा–

**( त्यांच्या मागोमाग जातो. )**

**इंदिरा०**—**( शारदेला पोटाशीं धरून )** देवा ! या माझ्या येवढ्याशा निरपराधी पोरीवर एवढा दुःखाचा पर्वत लोटून दिलास, यांत काय न्यायीपणा दाखविलास, तुझा तुला ठाऊक ! चल शारदे, घरांत चल ! काय करायचं ?

**शारदा**—**( गळ्यास मिठी मारून )** आई, इतका वेळ होतीस कुठें तूं ? आणि अशी ओढतेस कां ? कुणीकडे घेऊन जातेस मला ? माझे इतके धिंडवडे काढलेत, तरी पुरे नाहीं का झाले ? त्या दिवशीं विष देऊन मारून टाक म्हणून किती विनवण्या केल्या, तें तुझ्या हातून झालं नाहीं; आणि आज हे मुलीचे लग्नसोहाळे पहावतात का ग तुला ?

**इंदिरा०**—**( रडत )** नको नको ! शारदे, मी तुला पदर पसरतें, या वेळीं आणखी असं बोलूं नकोस ! हें बघ—

**पद्य**–( अरे मेरे राम प्यारे राम. )

**आधिं तुझ्या या दुःखानें, प्राण असोनी मेलें ॥ धृ० ॥**
**त्यांतुनि शब्द विषारी ॥ बोलसि हे मर्मविदारी ॥**
**साहुं कसें त्राण नसे भेदिति हृदयां जणुं भाले ॥ १ ॥**

**शारदा**—आई हा काय गोंधळ आहे तो तरी सांग मला !

**पद्य**–( आसजन गले. )

**मी समजुं तरि काय भुले मन ॥ पडति अक्षता शिरिं न**
**तोंचि हें उद्भवलें मधिं काय कळेचि न ॥ धृ० ॥**
**हासुं काय सुढलें मी म्हणुनी ॥ का रडुं हें मस्तक पिटुनी**
**लग्न होय कीं कुंवार अजुनी ॥ हरहर देवा काय विडंबन ! ॥ १ ॥**

**इंदिरा०**—घरांत चल तुला सर्व सांगतें. ( **तिला घेऊन जाते.** )

**कोदंड**—शिव शिव ! हिरण्यगर्भा ! केवढा अंध, अविचारी मी ! उपकारसुद्धां विचारानंच केला पाहिजे, नाहीं तर तोच अपकार होतो म्हणतात, तें आज माझ्या प्रत्ययाला आलं. या शारदेचं कल्याण करण्याच्या बुद्धीनं मीं हें काय केलं पाहिलंस !

**पद्य**–( माई सरसती शारदा. )

**म्यां लोटिली संकटीं ॥ निष्कारण शारदा बिचारी,**
**मानिल मजसि महाकपटी ॥ धृ० ॥ बाल मृगी**
**वृकमुखिंची ओढुनि ॥ टाकियली दावाग्नित हातीं ॥**
**केविं ताप साहिल सुकुमारी एकटीं ॥ संकटीं ॥ १ ॥**

ते वैद्यबुवा आले. चल मित्रा.

( **जातात.** )

---

# अंक ५ वा

## प्रवेश १ ला

स्थळः—रस्ता.

कांचन०—( वेड्याच्या वेषानें )

पद्य-( बारोप्रिया ब्यागत. )

**घट तीन धनानें भरले ॥ नसती ठावे कोणा, गुप्त ते तळघरीं पुरले ॥ धृ० ॥ उरलें कन्याधन करिं पडतां ॥ व्याजवृद्धि वर्षासन येतां ॥ कांहीं थोड्या काळें, पाहीन दैन्य मम सरलें ॥ १ ॥**

भुजंग बरा झाला कीं त्याच्या गळ्यांत पोरगी बांधतों; आणि राहिलेला हुंडा घेतों चोपून. पण तो म्हणेल दीक्षितांकडून घे; आणि दीक्षित आहेत कैदेंत. मग ? बरं यांतल्या रिकाम्या थैल्या किती आहेत. पहात नाहींना कुणी ? ( **सोडीत** ) जयंताच्याऐवजीं मुलगीच झाली असती, तर छान झालं असतं. अरे ! या थैलींत दगड कुणी भरून ठेविले ! ( **हंसून** ) बायको म्हणते तुम्हांला वेड लागलं आहे; बाहेर जाऊं नका. ( **पाहून** ) आली रे आली ! तीच आली. मला खांबाशीं बांधून डागायचा बेत आहे तिचा. हं ! पळा तर इथून; त्या देवळांत लपून बसूं.

**( रुपया, रुपया म्हणत चिंध्या गोळा करून पळून जातो. )**

**इंदिरा०—( धांवत येऊन )** अहो, आडवा हो त्यांना. हं, ठेवा उभे करून. अगबाई ! त्यांनासुद्धां लोटून देऊन गेले पार ! काय बाई हें वाऱ्यासारखं धांवणं ! मी बायकोमाणूस, पळूं तरी किती यांच्यामागून. पळूं नये म्हटलं, तर हा मेला जीव रहात नाहीं. ( **हिरण्यगर्भ येतो त्यास** ) तुम्ही त्यांना धरण्याकरितां धांवलांत, पण ते कांहीं सांपडत नाहींत. ( **रडत** ) दुसऱ्याला असा विनाकारण त्रास होतो याचं वाईट वाटतं.

**हिरण्य०**—त्रास कसला इंदिराबाई ! पण रडतां कां अशा ?

**इंदिरा०**—रडूं नको तर काय करूं ! अहो.

**पद्य**–( मदनतात मनमोहन. )

**हाल इकडचे पहावया कां आजवरी जगलें ॥ नाहिं अन्न ना स्नान न निद्रा दिवस किती झाले ॥ धृ० ॥ पोरें टोरें लागति पाठी हसती चिडविती ॥ ऐकवेनसें बोलति भलतें अति चेष्टा करिती ॥ कोणि मारिती बघवेना हो उपायही हरले ॥ १ ॥**

**हिरण्य०**—इंदिराबाई, तुम्ही आतां घरीं चला. मी त्यांना कांहीं वेळानं घेऊन येतों.

**इंदिरा०**—घरीं जाऊन तरी काय ! रडायचंच. तुमच्या त्या कोदंड-बुवांनीं चांगल्या बुद्धीनंच भुजंगनाथाचं लग्न मोडलं म्हणा, पण आतां ते मेले गांवांतले गळेकापू शास्त्री ! माझ्या पोरीचं लग्न झालं म्हणूनच बसले आहेत. अहो, त्यांना कोणी चांगला दडपता नाहीं का हो ! ( **डोळ्यांस पदर लावून** ) मेल्यांनो, नुसत्या अक्षतासुद्धां पडल्या नाहींत, आणि लग्न झालं म्हणतां ! या दुष्टाव्याबद्दल देव तुम्हांला खास खास पाहून घेईल रे चांडाळांनो !

**हिरण्य०**—इंदिराबाई; तुम्हांलां अजून कळलंच नाहीं म्हणायचं ! येथील शास्त्र्यांचा दुराग्रह पाहून माझा मित्र कोदंड शंकराचार्यांकडे गेला होता, तो आज सकाळींच परत आला; आणि आतां जगद्गुरूंकडून आणलेलं आज्ञापत्र इथल्या ब्राह्मणसभेंत घेऊन गेला आहे.

**इंदिरा०**—काय आणलं आहे आज्ञापत्र ?

**हिरण्य०**—त्यांतला सारांश हा कीं सप्तपदी झाल्यावांचून विवाह पूर्ण होत नाहीं. ब्राह्मणांनीं धर्मसंबंधांत स्वतंत्र बंडाळी करणं इष्ट नाहीं. हें आज्ञापत्र मान्य न केल्यास इकडून विलंब न लागतां योग्य तो विचार होईल.

**इंदिरा०**—आणि हें इतकं सगळं कोदंडांनीं केलं ना ? देवा, त्यांना उदंड आयुष्य दे, आणि त्यांच्या हातून तरी माझ्या शारदेवरचं एवढंच अरिष्ट दूर करीव !

**हिरण्य०**—-वरं इंदिराबाई, मी विचारूं नये, ( **चोहोंकडे पहात** ) पण शारदा माझी सख्खी वहीण, आणि तुम्ही माझ्या मातुःश्री अशा भावानं विचारतों, कीं काल मीं कांहीं ऐकलं. तें—

**इंदिरा०**—समजलें समजलें. तुमच्या कानांपर्यंतसुद्धां आलीना ती गोष्ट ! ( **रडूं कोसळून** ) मेल्या दुर्दैवानं भाजल्यावर डाग दिलान् हो ! आतां तर पोरीकडे पहावत देखील नाहीं. असं वाटतं कीं विष खाऊन प्राण द्यावा ! हेंच जर व्हावयाचं तसं होऊन मग आलं असतं—



**हिरण्य०**—इंदिराबाई, हें काय ! वयमानाप्रमाणं घडून येणाऱ्या गोष्टीविषयीं निरर्थक दुःख करून काय होणार !

**इंदिरा०**—( **सुस्कारा सोडून** ) तेंहि खरंच.

**पद्य**–( भैरवी : त्रिताल )

**नशिबीं असे नच तें टळे ॥ परि उगिचचि आइचें आंधळें हें खुळें मन तळमळे ॥ धृ० ॥ संकटिं दुसरें संकट हें ॥ कैसें खट आलें ॥ कां रे देवा त्वां मुलिशीं ॥ वैर असें धरिलें ॥ चिंता वाढे शतपट आतां ॥ पति तिस कसा न कळे मिळे ॥ १ ॥**

( **एकदम सुचल्यासारखें करून** ) का हो हिरण्यगर्भ, कोदंडांचं लग्न अजून व्हावयाचं आहे म्हणून ऐकलं, तें खरं का ?

**हिरण्य०**—मी समजलों हें विचारण्याचा उद्देश ! माझ्याहि मनांत तें कधींच आलं आहे.

**इंदिरा०**—पहा एवढं जर घडवून आणलंत तर बहिणीच्या हातांत तुम्हीं चुडे घातल्यासारखं होईल. धर्मापरी धर्म घडून वृक्षावर वेल चढविल्याचं पुण्य लागेल.

**हिरण्य०**—आतां मला जास्त सांगायला नको. पण तुम्ही जातां ना घरीं ?

**इंदिरा०**—जातें. देवळांतूनच जातें म्हणजे झालं. पण मीं म्हटलेलं ध्यानांत राहील ना ?

**हिरण्य०**—त्याविषयीं अगदीं निश्चिंत असा. ( **इंदिराबाई जाते.** ) काय बिचारीच्या जिवाची त्रेधा चालली आहे ! बरं कोदंड अद्याप कां येत

नाहीं ! चला आपणच त्या सभेकडे जाऊं ( **कोदंड येतों त्यास** ) कां कोदंडा, कसं काय झालं, सांग लौकर. श्रींचं आज्ञापत्र पाहून शास्त्रीमंडळींचे डोळे उघडले असतील चांगले !

**कोदंड**--( **प्रवेश करून** ) काय वेडा आहेस तूं ! अरे, जे दुराग्रहमदानं अंध झाले, त्यांचे डोळे असे कसे उघडतील ?

**हिरण्य०**--तर मग काय जगद्‌गुरूंची आज्ञासुद्धां त्यांनीं अमान्य केली ?

**कोदंड**—नसती केली तर आश्चर्य ! कारण,

**पद्य**-( अति करुण शरण. )

**ते कुटिल कपटि काक जातिचे ।। व्रणविदारणांत निपुण, परिशिलें न ज्यांनिं कानिं नांव सुमतिचें ।। धृ० ।। काकाची ती सभाहि ।। ओरडले कोणि कांहिं ।। मान्यांना मान नाहिं ।। निंदक जे स्मृतिचे ।। १ ।।**

**हिरण्य०**—त्यांचं म्हणणं तरी काय मग ?

**कोदंड**—हेंच, कीं क्षेत्रस्थांच्या मनाविरुद्ध शंकराचार्यांची आज्ञा आम्हांला मान्य नाहीं. असं म्हणणाऱ्यांचाहि मला इतका राग आला नाहीं; पण तो सुवर्णशास्त्री मोठ्या प्रतिष्ठितपणानं म्हणतो, कीं अहो कोदंड ! श्रींची संमति मिळालीच आहे; आतां तुम्हीच शारदेला सनाथ करा म्हणजे झालं. म्हणजे श्रींचीहि आज्ञा पाळल्यासारखी झाली, आणि त्या दीन धेनूचाहि उद्धार केल्याचं पुण्य मिळालं !

**हिरण्य०**—जाऊं दे मित्रा, दुष्ट तो दुष्टच ! मी तुझी मार्गप्रतीक्षा करीत बसलों असतां, आपल्या वेड्या नवऱ्यामागून धांवत आलेली इंदिराबाई मला भेटली. तुला काय सांगूं ! पतीच्या व कन्येच्या अशा द्विविध दुःखांत ती अद्यापि जिवंत कशी राहिली, हेंच नवल ! त्यांतून शारदेच्या दुःखानं तर तिचं हृदय अगदीं विदीर्ण झालं आहे !

**कोदंड**—कां नाहीं व्हायचं ? अरे माझा आणि त्या शारदेचा कांहीं संबंध नसतां, तिच्याविषयीं मला इतकं वाईट वाटतं ; मग ती तर प्रत्यक्ष आईच तिची !

**हिरण्य०**—आणि मित्रा! शारदेसाठीं तूं किती श्रम घेत आहेस, हें जेव्हां मीं तिला सांगितलं, तेव्हां तर तिचे डोळे भरून आले. तुला दीर्घायुष्य चिंतून, त्यांचंहि लग्न अजून व्हायचं आहेना? असं किती आशाळभूत दीन मुद्रेनं तिनं मला विचारलं म्हणतोस! खरंच मित्रा, तूं आतां तुझ्या पूर्वींच्या प्रतिज्ञेपासून मुक्त झाला आहेस. मग तूंच शारदेचं पाणिग्रहण करिनास?

**कोदंड**—हिरण्यगर्भा, शारदेची सांप्रतची कष्टमय अवस्था, याच प्रसंगीं ब्राह्मणांनीं तिच्यावर धरलेलं शस्त्र, सध्यां लोकांकडून होणारा तिचा उपहास आणि तिची भावी भयंकर स्थिति या सर्व गोष्टी मनांत आणून, मी तिचं पाणिग्रहण करण्याला सिद्ध झालों समज; तथापि तिनं माझा स्वीकार कां करावा बरं! कारण—

**साकी**–( धन ज्या जवळी स्त्री त्याची )

**भूमि-सदन-धनहीन असा मी न मला तात न माता ॥**
**घ्यावें भिक्षापात्र तिनें कां वरूनि अशा अवधूता ॥ १ ॥**

बरं क्षणभर अशीहि कल्पना करूं कीं, हें साहस करायला ती तयार झाली; तथापि हे वेदशास्त्रशून्य व्रणान्वेषी ब्राह्मण आम्हां उभयतांचाहि किती छळ करतील, याची कल्पना नाहीं तुला...

**पद्य**–( मोरे लागीं )

**नागिणी चपल खलजिव्हा ॥ दुःस्वभावा धरि दावा,**
**चावेल संधि ये जेव्हां ॥ धृ० ॥ सुंदरदाराकरलोभानें ॥**
**विघ्न विवाहीं केलें त्यानें ॥ म्हणतिल, लांच्छन तें नांवा ॥ १ ॥**

असो, याविषयीं मग बोलूं. पण आधीं आज्ञेप्रमाणं ब्राह्मणसभेंत घडलेला वृत्तान्त श्रींना कळविला पाहिजे. तर चल बिऱ्हाडीं, पत्र देऊन गोरखाला श्रींच्या मुक्कामीं पाठवून देऊं. **( जातात. )**

---

## प्रवेश २ रा

**स्थळ** :—नदीकांठ.

**( शारदा जीव देण्याच्या तयारीनें येते. )**

**शारदा**—स्वप्नाच्या नादांत मी किती लौकर या स्मशानाजवळ आलें ? त्या पेटलेल्या चितेच्या उजेडानं अंधुक अंधुक दिसतो आहे, तोच डोहाचा खडक. **( चालतां चालतां )** मरणा, लोकांच्या सांगण्यावरून मी तुला आजपर्यंत भयंकर समजत होतें; पण आज अनुभवानं सांगतें कीं—

**पद्य**–( रडत माझें बाळ )

**सदय शान्त असशी मरणा ॥ भीति तुझी वाटेना ॥ धृ० ॥**
**हीन दीन दुःखी दुबळी ॥ ज्यांस ओस दुनिया सगळी ॥**
**येति त्यांस घेसी जवळी ॥ प्रेम तुझें आटेना ॥ १ ॥**
**म्हणुनि मीहि येतें वेगें ॥ मायबाप सोडुन मागें ॥**
**कर्म फार गांजूं लागे ॥ दुःख पोटिं सांठेना ॥ २ ॥**

इतका निर्धार केला, तरी अजून आईकडे मन धांवतं. मी नाहींशी झालें असं कळेल, तेव्हां बिचारी दुःखानं धायधाय करील. जयंताला तर चुकल्याचुकल्यासारखं होऊन 'अक्का कुठं आहे ग ?' म्हणून आईला विचारील ! पण जाऊं दे. मायेनंच मनुष्य फसतं. अगदीं डोहांत उडी पडेल अशा ठिकाणीं खडकावर उभं रहावं. आहा ! ही जागा चांगली आहे. **( कांस घालून कंबरेला दगड बांधून )** देवा ! माझ्या आईला, बाबांना, तसंच जयंताला माझा लौकर विसर पडेल असं कर. माझं कल्याण व्हावं म्हणून ते कोदंड किती झटले त्यांना सुखी ठेव. माते नदी—

**पद्य**-( दे मला काळि घोंगडी. )

**जी मला जन्म दे आई, तीहि या काळीं । पारखी झाली ॥**
**तूं दुजी माय गे माझि म्हणुनि तुजजवळीं तांतडी केली ॥**
**सप्रेम सुता घे उदरिं फार ही भ्याली । ब्राह्मणीं छळिली ॥ चाल ॥**
**समजली प्रीति वडिलांची, काय ती ॥ उमजली नीति शास्त्रांची काय ती ॥ ये वीट कुडीचा बाई नको ही मेली, अमंगळ असली ॥ १ ॥**

( देवा ! आलें रे आलें ! असें ओरडून उडी टाकणार इतक्यांत कोदंड धांवत येऊन तिला धरून ) हां हां हां ! शारदे ! काय ! करतेस हें !

पद्य-( हा प्रभाव सर्वहि. )

थांब थांब करिसि असा आत्मघात कां ? ।। दाटुनि कां घेसि शिरीं घोर पातका ? ।। धृ० ।। सोशिलासि दुःखताप तोंचि तप घडे ॥ होसि दिव्य, जळुनि जाय, दुरित सांकडे ॥ जातां कां पडसि बळी नीच अंतका ।। १ ।।

शारदा—( कपाळावर हात मारीत खालीं बसून ) अरे चांडाळा दुर्दैवा ! अजून देखील तूं माझी पाठ सोडीत नाहींसना !

पद्य-( चाल कानडी दादरा. )

काय मी अभागिनी ॥ मजसि मरुंहि न दे कुणी ।। धृ० ।।
अससि कोण पुण्यवंत ।। माझा कां बघसि अंत ।।
ठेवुनि मज जगीं जिवंत ॥ लाभ कुणा काय त्यांत ।।
सोड मला, ऐक विनवणी ।। १ ।।

कोदंड—शारदे, तूं मला ओळखलंस का पण ?

शारदा—( न्याहाळून पाहून ) अगबाई ! कोदंडमहाराज ! तर मग माझं स्वप्न खरं होणार कीं काय ! ( उत्कंठेनें ) आपण इथें अकस्मात् कसे आलांत ? माझ्या दुर्दैवानं का सुदैवानं ?

कोदंड—तुझ्या-माझ्या उभयतांच्याहि सुदैवानं ! कारण, येथील शास्त्री-भिक्षुकांचं बंड मोडून, आपल्या समक्ष आज सायंकाळच्या सुमुहूर्तावर तुझा विवाह करण्याकरितां, शंकराचार्यांची स्वारी आतांच येणार आहे. म्हणून प्रातःस्नान, संध्यार्चन आटपून घेण्यासाठीं मी गंगेवर चाललों होतों. इतक्यांत कोणी स्त्री स्मशानाकडे चालल्याचा भास झाला. कशामुळें असेल तें असो, परंतु मला तुझाच संशय येऊन, तुझ्या मागोमाग इथपर्यंत आलों, आणि पहातों तों माझा संशय खराच !

शारदा—तुमच्या संशयाप्रमाणं माझं स्वप्नसुद्धां खरं होणार तर मग ! महाराज, आपला स्वप्नावर विश्वास आहे का ?

**कोदंड**—अगदीं निदिध्यास लागलेल्या गोष्टीविषयींच्या स्वप्नांतलीं कांहीं स्वप्नं क्वचित्कालीं अंशतः खरीं होतात. तुला कोणतं स्वप्नं पडलं होतं सांग पाहूं ?

**शारदा**—अशी अडीच तीन तास रात्र राहिली असेल आणि माझा डोळा लागून असं स्वप्न पडलं कीं, मी जीव देण्याकरितां नदीवर आलें. आणि आतां अशी उडी टाकणार ( **कोदंड झटकन् तिचा हात धरतो.** ) इतक्यांत आपण येऊन, माझं असंच पाणिग्रहण केलंत.

**कोदंड**—झालं तर ! शारदे, हें स्वप्न इतकंच खरं व्हायचं होतं !

**शारदा**—( **किंचित् निराश होऊन** ) काय म्हटलंत महाराज ?

**कोदंड** —असं वाईट वाटूं देऊं नकोस. कारण जगद्‌गुरूंनीं तुझ्याकरितां जो वर निश्चित केला आहे, तो एक तरुण, विद्वान्, श्रीमंत असून—

**शारदा**—( **कानांवर हात ठेवून** ) नको नको नको ! तो मेला भयंकर शब्द मला ऐकायलासुद्धां नको. त्याच्याच पायीं माझी अशी दशा झाली. बरं आणखी एकदां मी आपल्याला विचारतें कीं, नाहींना माझं सगळं स्वप्न खरं होत ?

**कोदंड**—शारदे, कांहीं महत्कार्याकरितां मीं अविवाहित राहण्याचा संकल्प केला आहे. तो मला मोडतां येत नाहीं.

**शारदा**—मग माझा निर्धार मला मोडतां येत नाहीं. सर्वस्वीं आपली झालेली ही काया भलत्याच्याच सेवेंत झिजवायची, त्यापेक्षां माशांनीं खाल्लेली काय वाईट ! माझा असा शेवट कां झाला, हें जगाला नीट समजावून सांगा. येतें मी आतां. ( **धांवूं लागते.** )

**कोदंड**--( **तिला धरून** ) शारदे हें काय ? तुझ्या कल्याणार्थ मी इतका श्रमलों त्याचं हेंच फळ काय ?

**शारदा**—( **सोडवून घेऊन** ) व्हा दूर ! आतां माझ्या अंगाला स्पर्श कराल, तर तो निव्वळ पापबुद्धीनं करतां असं मी समजेन.

**कोदंड**--( **स्वगत** ) स्त्रीहत्येचं महापातक टाळण्याला या प्रसंगीं असत्य

बोलल्यावांचून गत्यंतर नाहीं. ( **उघड** ) शारदे मी तुझं पाणिग्रहण करतों, पण हें साहस करूं नकोस. ( **तिला अडवितो.** )

**शारदा**—( **त्याचा हात दूर करते** ) त्या उगवत्या सूर्यनारायणासमक्ष वचन दिल्याशिवाय मला खरं वाटावयाचं नाहीं.

**कोदंड**--बरं तर.

**पद्य**-( जयति जय सुरसरित. )

**घेइ मम वचन हें सुगुणमणिमंजिरी ।। धृ०।। साच तुज वरिन मी भंगुनिहि मन्नियम ।। साक्षि अरुणाक्षि, तो विश्वसाक्षी करी ।। १ ।।**

**शारदा**--( **कंबरेचा धोंडा सोडून** ) आणि मीहि माझ्या देहाऐवजीं दुःखाच्या ओझ्याबरोबर या मेल्या दगडाला नदींत टाकतें.

**कोदंड**--तो पहा शिंगाचा ध्वनि ऐकूं येतो. जगद्गुरुंची स्वारी आली वाटतं. अहाहा ! शारदे, सुप्रभातकाल म्हणजे मंगलकारक खरा.

**पद्य**-( उठि प्रभातमा पोरमा. )

**हा बालदिवाकर करीं ।। अंधकारा हरी ।। दुःख वारी दुरी ।। बघ तुझेंहि ।। धृ० ।। चल शंकरगुरुसन्निधीं ।। थोर करुणानिधी ।। प्रणत होउनि पदीं ।। कळवूं हेंहि ।। १ ।।**

**शारदा**--( **हात जोडून** ) ही मी तयार आहें !

( **जातात.** )

---

# प्रवेश ३ रा

**स्थळः**--रस्ता.

**( बिंबाचार्य व हिरण्यगर्भ बोलत बोलत प्रवेश करतात. )**

**बिंबाचार्य**—आम्हीं ऐकलं कीं सायंकाळीं वाद होणार.

**हिरण्य०**—छे ! छे ! प्रातःकाळीं श्रींची स्वारी मठांत येतांच वादाला प्रारंभ होऊन, दोनप्रहरीं समाप्त झाला.

**बिंबाचार्य**—वादश्रवणाचा असा अपूर्व प्रसंग आला असतां आम्हीं दवडला ! अरे अरे ! असो, प्रत्यक्ष गंगाप्रवाहांतील नाहीं तर कावडींतील तरी गंगाजल प्राशन करावं. तुम्हींच त्या वादप्रसंगाचं सुंदर वर्णन करा म्हणजे झालं.

**हिरण्य०**—मला आतां वेळ नाहीं. कारण शारदा-कोदंडविवाहकाल अगदीं जवळ आला, म्हणून थोडक्यांत सांगतों, ऐका. श्रींची स्वारी सभेंत येऊन आसनावर विराजमान होतांच, क्षेत्रस्थांचे प्रमुख जे भट्टाचार्य, त्यांनीं प्रथमतः ' वाचादत्ता मनोदत्ता कृतकौतुकमंगला ' इत्यादि कश्यपवचनाच्या आधारानं पूर्वपक्ष केला.

**बिंबाचार्य**—वाहवा ! वाहवा ! भट्टाचार्य म्हणजे जाडीच प्रकरण तें. त्यांचा पूर्वपक्ष ! मग काय विचारावं ! बरं मग ?

**हिरण्य०**—मग काय ! श्रीसमागमें आलेले रामनंदनाचार्य, ऐका ऐका म्हणून सरसावले पुढें. त्यांची ती भव्य मुद्रा, तो गंभीर कंठ, ती अगाध विद्वत्ता, ती अलौकिक वाक्पटुता, तें सूक्ष्म अवलोकन, ती अश्रुतपूर्व स्मरणशक्ति, इत्यादि अद्वितीय गुण पाहून सभा थक्क झाली. पूर्वपक्षाचं खंडन करतांना, प्रसंगानुरूप मनु, याज्ञवल्क्य, देवल, शातातप, नारद, कात्यायन, शौनिक, वसिष्ठ इत्यादिकांना त्यांनीं मूर्तिमंत आणून सभेंत उभें केलं, असा भास झाला. रामनंदनाचार्यांचा वाक्प्रवाह एखाद्या वेगवान नदीप्रमाणं धो धो शब्द करीत चाललेला पाहून, प्रत्यक्ष जगद्गुरूंनींहि मान डोलविली ! अहाहा ! काय सांगू बिंबाचार्य !

पद्य–( वाहवा थोर तूं भूपाला. )

**जेव्हां वाद भरा आला ॥ चढलें स्फुरण अधिक त्याला ॥ धृ० ॥ वादरणींचा रणपंडित तो, वीर धनंजय जैसा ।. स्मृतिशास्त्राचा अक्षय भाता, सारथि सद्गुरु सरिसा ॥ १ ॥ घ्या हो म्हणुनि वचनसायकां वाक्गांडिवा जोडी ॥ ओढी परपक्षावरि सोडी, शिरें तयांचीं पाडी ॥ २ ॥ हठवादी, ते भट्टकटकभट, त्या सन्मुख लटपटले ॥ हटले चुटपुटले, मग उठले श्रींच्या चरणीं तटले ॥ ३ ॥**

**बिंबाचार्य**—अरे, अरे, अरे, अरे ! एकूण भट्टाचार्यांची शेवटीं अशी फजिती झालीना ? व्हावयाचीच, कारण जंबुकानं सिंहाच्या अंगावर चालून जावं, तसा प्रकार त्यांनीं केला होता. बरं, नंतर काय झालं ?

**हिरण्य०**—नंतर श्रींची स्वारी भट्टाचार्यप्रमुख शास्त्रीभिक्षुकांस विवाह-मंडपांत येण्याविषयीं आज्ञा करून विवाहाची तयारी कोठपर्यंत आली तें पाहण्याकरितां स्वतः हेरंबमहालांत निघून गेली.

**बिंबाचार्य**—शेवटीं देशस्थ शारदा, आणि कोकणस्थ कोदंड, असं हें गंगाजमनी जोडपं होणार अं ! असो, जगद्गुरूंनींच निर्णय केला तेव्हां तो आम्हांला मान्य आहे. बरं पण कां हो, अविवाहित रहायचं अशी कोदंडाची प्रतिज्ञा होतीना ?

**हिरण्य०**—हो, होती. परंतु श्रींनीं आद्यशंकराचार्यांच्या शिवगुरुनामक पित्याची गोष्ट सांगून गृहस्थाश्रमाचं खरं महत्त्व मनांत भरवून व तारुण्यां-तील प्रतिज्ञा बहुधा विचारपूर्वक केलेल्या नसतात, असं सप्रमाण सिद्ध करून, त्याचं मन वळविलं.

**बिंबाचार्य**—तें सगळं यथास्थित झालं म्हणा, परंतु कांचनभटाचं वेड अद्यापि गेलं नाहीं तेव्हां आज कन्यादान कोणाच्या हातून होणार ?

**हिरण्य०**—मुलीच्या मातुलाच्या हातून. तो श्रीसमागमें आजच इथं आला आहे.

**बिंबाचार्य**—बरं, ते भुजंगनाथहि हिंडूं-फिरूं लागले म्हणतात, खरं का ?

**हिरण्य०**—हो हो, वैद्यबुवांनीं त्याला मृत्यूच्या दाढेंतून मोठ्या शर्थीनं ओढून काढला. आतां तो श्रींच्या आज्ञेनं चतुर्थाश्रम घेऊन महायात्रेला जाणार आहे.

**बिंबाचार्य**—योग्य योग्य ! वृद्धापकाळीं हेंच योग्य ! असं असून बेटा विवाह करायला निघाला होता ! आज ते विवाहमंडप साजरा करायला येणार असतीलच ?

**हिरण्य०**—अवश्य, ते तर आलेच पाहिजेत ?

**बिंबाचार्य**—मग चल, आपणहि येणार. असा योग तरी पुढं कधीं यावा ?

**हिरण्य०**—चला, वाद ऐकणार होतां, तो विवाहच पहा म्हणजे झालं. चला लौकर. या पहा भटाभिक्षुकांच्या झुंडीच्या झुंडी धांवताहेत दक्षिणेकरितां. **( जातात. )**

---

# प्रवेश ४ था

**स्थळः**— हेरंबमहाल.

**( सर्व राजचिन्हांनीं युक्त असे श्रीमत् जगद्गुरु सिंहासनावर विराजमान झाले आहेत, सभाजन हात जोडून उभे आहेत, वैतालिक बिरुदावलि गात आहेत. )**

**वैता०**—श्रीमत्परमहंस परिव्राजकाचार्यवर्य, पदवाक्यप्रमाणपारावारपारीण, यमनियमासनप्राणायामप्रत्याहारध्यानधारणासमाध्यष्टांगयोगानुष्ठाननिष्ठ, तपश्चक्रवर्ती, अनाद्यविच्छिन्नगुरुपरंपराप्राप्तषट्दर्शनसंस्थापनाचार्य, व्याख्यानसिंहासनाधीश्वर, सकलनिगमागमसारहृदय, सांख्यत्रयप्रतिपादक, वैदिकमार्गप्रवर्तक, सर्वतंत्रस्वतंत्र, श्रीमहाराजधानी श्रीमत् राजाधिराजगुरु भूमंडलाचार्य ऋष्यशृंगपुरवराधीशपंचगंगातीरवासकमलानिकेतनकरवीरसिंहासनाधीश्वर, श्रीमत् शंकरभगवत्पादजान्हवीजनित श्रीविद्यानरसिंहभारतीमहाराज !

**जगद्गुरु**—**( आशीर्वादात्मक नारायण ! नारायण ! असें म्हणून सर्वांस बसावयास सांगून रामनंदनाचार्य येतात त्यांस )** का रामनंदनाचार्य, कोठपर्यंत आलं ! सप्तपदी पूर्ण झाली का ?

**रामनंदन०**—होय महाराज. सप्तपदी होऊन वधूवरांनीं ध्रुवदर्शनहि घेतलं. आतां जगद्गुरुचरणवंदनार्थ, तीं उभयतां इतक्यांत इकडे येतील.

**जगद्गुरु**—ईश्वरानं कार्य निर्विघ्नपणें पार पाडलं. रामनंदनाचार्य, या बसा असे. या प्रसंगीं तुम्हीं चांगलं साह्य केलंत, म्हणून तुमच्या अलौकिक विद्वत्तेस अलंकारच अशी ‘ सभामार्तंड ’ ही पदवी संस्थानदेवतेकडून तुम्हांस मिळत आहे, तिचा स्वीकार करा.

**( कारकून पत्रिका व महावस्त्र वगैरे रामनंदनाचार्यांस देतो. )**

**रामनंदन०**—( **त्यांचा स्वीकार करून** ) माझ्या हातून जें अल्पस्वल्प कार्य झालं असेल, तें केवळ याच चरणप्रभावानं होय. अतएव या बहुमानास मी यत्किंचित्‌हि पात्र नाहीं. तथापि प्रसाद म्हणून—

**जगद्‌गुरु**—त्याचप्रमाणं, रामनंदनाचार्य; आजपासून या संस्थानच्या शास्त्रीमंडळांत अग्रस्थानीं तुमची योजना केली आहे.

**रामनंदन०**—हा तर मजवर श्रींकडून बहुमानाचा वर्षावच होत आहे !

**जगद्‌गुरु**—आणि त्याला तुम्ही सर्वतोपरी पात्रहि आहांत ! ( **भट्टाचार्यांकडे वळून** ) का भट्टाचार्य, असंच कीं नाहीं ! ( **भट्टाचार्य हात जोडून कोरडें हंसून मान हालवितो** ). ( **भुजंगनाथाकडे वळून** ) भुजंगनाथ ते तुम्हीच ना ? तुमचा तर पुनर्जन्मच झाला.

**भुजंग०**—होय महाराज आणि म्हणूनच आज या महापातक्याला हें जगद्‌गुरूंचं दर्शन झालं; पावन झालों ! आतां अर्धी संपत्ति धर्मार्थ आणि अर्धी पुतण्यास देऊन संन्यासी होऊन काशीवास करावा अशी इच्छा आहे.

**जगद्‌गुरु**—उत्तम आहे ! तुम्हासारख्यांना हाच उक्त मार्ग !

**( इतक्यांत कोदंड व शारदा येऊन जगद्‌गुरूंस साष्टांग नमस्कार करतात. शारदेच्या मैत्रिणी व जयंत तिच्या मागोमाग येतात. )**

**जगद्‌गुरु**—नारायण ! नारायण ! नारायण ! नारायण ! कोदंड, आजपासून तुम्ही गृहस्थाश्रमी झालांत. या आश्रमाचे धर्म तुम्ही जाणतच आहांत, परंतु हेंहि ध्यानांत ठेवा,—

**कोदंड**—काय ती आज्ञा व्हावी.

**जगद्‌गुरु**—ऐका—

**: साकी :**

**गृहलक्ष्मी ही स्त्री बहुमान्या सांभाळा प्रेमानें ॥**

तसंच शारदे,

**परमपूज्य पति दैवत तुज हें पूजिं यास नेमानें ॥**
**गृहसुख तुम्हि घ्यावें ॥ त्यांतचि परसुख साधावें ॥ १ ॥**

**कोदंड**—जगद्‌गुरूंची आज्ञा शिरसावंद्य आहे.

**वल्लरी**—गडे शारदे, ‘ तुला योग्य पति मिळेल ’ असं कोदंडांनीं तुला संगमनाथाच्या देवळांत आश्वासन दिलं होतं तें त्यांनीं खरं केलंना !

**( शारदा लाजून खालीं पहाते. )**

**जगद्‌गुरु**—अहो भट्टाचार्यप्रमुख, आम्हीं या कोदंडपंडितांस इतउत्तर या प्रांताचे धर्माध्यक्ष, व हिरण्यगर्भास त्यांच्या साहाय्यास नेमले आहेत. तर सर्वांनीं त्यांच्या धर्माज्ञेंत वागून, त्यांचा योग्य असा मान ठेवावा.

**सर्व**—**( हात जोडून )** जगद्‌गुरूंची आज्ञा आम्हांस प्रमाण आहे.

**कोदंड**—**( हात जोडून )** महाराज ! आमची योग्यता ती काय, आणि हा अधिकार केवढा !

**जगद्‌गुरु**—असो ! जगदीशानं आणखी तुमचं कोणतं इष्ट करावं ?

**कोदंड**—तूर्त हें होवो—

**पद्य**–( तुम जागो मोहन प्यारे. )

**जरठें न विवाह करावा ।। कधिं न जनकें जरठ वरातें तनुजादेह विकावा ।। धृ० ।। ही भवदाज्ञा जो नच पाळी ।। महापातकी स्वकुळा जाळी ।। लोकनियमनास्तव तत्काळीं ।। भूपें तो दंडावा ।। १ ।।**

**जगद्‌गुरु**—तथास्तु ! तथास्तु ! तथास्तु !

**( पडदा पडतो. )**

---

# ईशप्रार्थना

**पद्य**–( हरिलें मन्मन तव सुमुखानें. )

**सुमंत्रिमंडळ सार्वभौमिनी । सदा यशस्वी विजयशालिनी ।**
**बहुदिन पालो आर्यमेदिनी । नीति दया समदृष्टि धरोनी ।। धृ० ।।**
**प्रजाहि वागो राजशासनी । सद्धर्माचा आश्रय करुनी ।**
**अंधाचार विचार विसर्जुनि । सत्याचें दृढ कवच घालुनी ।**
**ज्ञानोद्यम हा मंत्र घेउनी । निज कर्तव्या जागो निशिदिनीं ।। १ ।।**

**– समाप्त –**